# महाराष्ट्र विधानपरिषद

## पहिले (अर्थसंकल्प) अधिवेशन, २०१९

---

## अतारांकित प्रश्नोत्तरांची यादी

**प्रश्नांची एकूण संख्या - ५०**

---

### राज्यातील कायम विनाअनुदानित वरिष्ठ महाविद्यालयाचा कायम शब्द काढण्याबाबत

**(१) ४४६४८ (३१-१०-२०१८). श्री.विक्रम काळे, श्री.सतिश चव्हाण, श्री.हेमंत टकले, डॉ.सुधीर तांबे, श्री.दत्तात्रय सावंत : तारांकित प्रश्न क्रमांक ४२६३४ ला दिनांक १६ जुलै, २०१८ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **उच्च व तंत्र शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय:-

(१) राज्यातील कायम विनाअनुदानित वरिष्ठ महाविद्यालयाचा कायम शब्द काढावा यासाठी शासनस्तरावर निर्णय घेण्याची प्रक्रिया पूर्ण झाली आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१२-११-२०१८)** : (१) व (२) राज्यामध्ये कायम विनाअनुदानित तत्वावर मान्यता दिलेल्या महाविद्यालयांचा कायम शब्द काढण्याची बाब शासनाच्या तूर्त विचाराधीन नाही.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## गोंदिया जिल्हा परिषद येथील उपअभियंत्याला लाच घेताना अटक केल्याबाबत

**(२) ४४६५४ (०५-११-२०१८). श्री.गिरीशचंद्र व्यास, प्रा.अनिल सोले, श्री.नागोराव गाणार, श्री.रामदास आंबटकर :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) गोंदिया, जिल्हा परिषद येथील आरोग्य विभागांतर्गत येणाऱ्या प्राथमिक आरोग्य केंद्रात विद्युतीकरण केलेल्या कामाचे देयक काढण्याकरीता उपअभियंता, श्री.सुनिल तोराणे यांना १ लाख रूपयाची लाच घेतांना अटक करण्यात आली, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, त्यांच्यावर निलंबनाची कार्यवाही करण्यात आली आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने उपअभियंता यांच्याविरुध्द कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**डॉ. दीपक सावंत (१७-११-२०१८) :** (१) होय.

(२) व (३) सदरहू कर्मचारी दोषी आढळून आल्यामुळे व हा कर्मचारी कंत्राटी पध्दतीवरील असल्याने त्यास सेवेतून काढून टाकण्यात आलेले आहे.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यात वरिष्ठ महाविद्‌यालयात तासिका तत्वावरील प्राध्यापकांना मानधन देण्याबाबत

**(३) ४४६७३ (३१-१०-२०१८). श्री.विक्रम काळे, श्री.सतिश चव्हाण, श्री.हेमंत टकले, डॉ.सुधीर तांबे, श्री.दत्तात्रय सावंत : दिनांक २० जुलै, २०१८ रोजी सभागृहाच्या पटलावर ठेवण्यात आलेल्या अतारांकित प्रश्नोत्तरांच्या यादी क्रमांक ५ मधील प्रश्न क्रमांक ३८१६८ ला दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **उच्च व तंत्र शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय:-

(१) राज्यात वरिष्ठ महाविद्यालयात तासिका तत्वावर माहे एप्रिल, २०१८ पर्यंत कार्यरत असणाऱ्या प्राध्यापकांची जिल्हानिहाय संख्या किती आहे,
(२) असल्यास, त्यांना मासिक मानधन दरमहा मिळत नाही, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन प्राध्यापकांचे मानधन दरमहा मिळण्यासाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१९-११-२०१८)** : (१) राज्यात वरिष्ठ महाविद्यालयात तासिका तत्वावर माहे एप्रिल, २०१८ पर्यंत कार्यरत असणाऱ्या प्राध्यापकांची जिल्हानिहाय संख्या पुढीलप्रमाणे आहे :-

| **जिल्हा** | **तासिका तत्वावर कार्यरत प्राध्यापकांची संख्या** |
|---|---|
| मुंबई | ३१० |
| ठाणे | ३८ |
| पालघर | ०६ |
| रायगड | १४ |
| सिंधुदूर्ग | १४ |
| रत्नागिरी | १४ |
| जळगाव | २५ |
| धुळे | ९५ |
| नंदुरबार | ०२ |
| सोलापूर | ५६३ |
| अमरावती | ६०६ |
| अकोला | ३२७ |
| बुलडाणा | २७६ |
| यवतमाळ | ३०० |
| वाशिम | २२१ |
| नागपूर | ७३० |

| | |
|---|---|
| वर्धा | ८० |
| भंडारा | १२५ |
| गोंदिया | १७२ |
| चंद्रपुर | २८७ |
| गडचिरोली | ८८ |
| कोल्हापूर | ९२६ |
| सांगली | ६६७ |
| सातारा | ७१८ |
| औरंगाबाद | ५२७ |
| जालना | ११२ |
| बीड | ३२१ |
| उस्मानाबाद | १८१ |
| पुणे | २४० |
| नाशिक | ६३ |
| अहमदनगर | ९१ |
| नांदेड | ५३५ |
| लातूर | ३९६ |
| परभणी | २४३ |
| हिंगोली | ६२ |
| **एकूण** | **९३६६** |

(२) व (३) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण २०१८/(१८५/१८)/मशि-३, दिनांक १४/११/२०१८ अन्वये उच्च शिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील अशासकीय अनुदानित महाविद्यालयातील विविध पदवी व पदव्युत्तर अभ्यासक्रमांसाठी नियुक्त तासिका तत्वावरील अध्यापकांच्या मानधनात वाढ करण्यात आली आहे. सदर शासन निर्णयान्वये तासिका तत्वावर नियुक्त अध्यापकांना त्यांचे मानधन दरमहा नियमित स्वरुपात सेवार्थ / एचटीई सेवार्थ प्रणाली मार्फत अदा करण्याबाबत सूचना देण्यात आल्या आहेत.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील प्राथमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळांमध्ये शिक्षक व शिक्षकेतरांची रिक्त पदे भरण्याबाबत

**(४) ४४७१५ (०१-११-२०१८). श्री.विक्रम काळे, श्री.सतिश चव्हाण, श्री.हेमंत टकले, डॉ.सुधीर तांबे, श्री.दत्तात्रय सावंत, श्री.रामदास आंबटकर, प्रा.अनिल सोले, श्री.नागोराव गाणार : तारांकित प्रश्न क्रमांक ४१४३० ला दिनांक १६ जुलै, २०१८ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात प्राथमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळेतील सुमारे २४ हजार शिक्षकांची पदे रिक्त असल्याचे दिनांक १५ ऑक्टोबर, २०१८ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, राज्यात मराठी माध्यमांच्या प्राथमिक ते उच्च माध्यमिक शाळांमधील शिक्षक व शिक्षकेतरांची आज अखेर किती पदे रिक्त आहेत व त्याची सद्य:स्थिती काय आहे,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सदर रिक्त पदे भरण्यासाठी कोणती उपाययोजना केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१९-११-२०१८) :** (१) अंशत: खरे आहे.

(२) सन २०१८-१९ च्या संचमान्यतेत अतिरिक्त झालेल्या शिक्षकांच्या समायोजनानंतर शिक्षकांची रिक्त पदांची संख्या निर्धारित होईल. तसेच शिक्षकेतर पदांचा आकृतिबंध मंजूर झाल्यानंतर त्यांच्या रिक्त पदांची संख्या निर्धारित होईल.

(३) शिक्षकांची रिक्त पदे भरण्याच्या अनुषंगाने “पवित्र” संगणकीय प्रणाली कार्यान्वित करण्यात आली आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

___________

## मुंबईतील रस्ते बांधकामाकरीता वाहतूक विभागाची परवानगी मिळण्याबाबत

**(५) ४४७१९ (०१-११-२०१८). श्री.विजय ऊर्फ भाई गिरकर, श्री.प्रविण दरेकर, श्रीमती स्मिता वाघ :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबईतील सुमारे ५०० कि.मी. चे नवीन रस्ते महानगरपालिकेमार्फत उभारणीचे काम वाहतूक विभागाची परवानगी न मिळाल्यामुळे प्रलंबित असल्याचे माहे सप्टेंबर, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन मुंबईत नवीन रस्ते उभारणीकरीता वाहतूक विभागाची परवानगी मिळण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२२-११-२०१८) :** (१), (२) व (३) बृहन्मुंबई महानगरपालिका क्षेत्रात एकूण ३१७.२१ कि.मी. लांबीच्या रस्त्यांची कामे प्रगतीपथावर असून, यामध्ये ६८१ रस्त्यांचा समावेश आहे. यामध्ये ३८० प्रकल्प रस्ते व ३०१ पुनरुत्थान (Resurfacing) रस्त्यांचा समावेश आहे.

३८० प्रकल्प रस्त्यांपैकी ३३९ रस्त्यांसाठी वाहतूक विभागाची परवानगी प्राप्त झाली असून, उर्वरित ४१ रस्त्यांच्या परवानगीसाठी महानगरपालिकेमार्फत वाहतूक विभागाकडे अर्ज दाखल करुन, त्याबाबत पाठपुरावा करण्यात येत आहे.

पुनरुत्थान रस्त्यांसाठी वाहतूक विभागाची परवानगी मागण्यात येत नसल्याचे महानगरपालिकेमार्फत कळविण्यात आले आहे.

तसेच, महानगरपालिकेमार्फत ३४७.१८ कि.मी. लांबीच्या १२८९ रस्त्यांच्या दुरुस्तीची कामे प्रस्तावित असून, याअनुषंगाने निविदा प्रक्रिया सुरु आहे. निविदा प्रक्रियेनंतर सदर रस्त्यांच्या कामासाठी महानगरपालिकेमार्फत वाहतूक विभागाकडे अर्ज करण्यात येणार आहे.

___

## मराठवाडा विभागातील जिल्हा परिषदेच्या माध्यमिक शाळेतील मुख्याध्यापक व शिक्षकांची रिक्त पदे भरण्याबाबत

**(६) ४४७२० (२६-१०-२०१८). श्री.विक्रम काळे, श्री.सतिश चव्हाण, श्री.हेमंत टकले, डॉ.सुधीर तांबे, श्री.दत्तात्रय सावंत** : सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मराठवाडा विभागातील जिल्हा परिषदेच्या माध्यमिक शाळांची संख्या इतर विभागाच्या तुलनेत जास्त असून त्या माध्यमिक शाळांमध्ये वर्ग-२ मुख्याध्यापकांची व शिक्षकांची जिल्हानिहाय एकूण मंजूर पदे किती आहेत, त्या मंजूर पदापैकी माहे ऑगस्ट, २०१८ अखेर किती पदे रिक्त आहेत,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन मराठवाडा विभागातील माध्यमिक शाळांसाठी सर्व भौतिक सोयीयुक्त टाईप प्लॅन करुन इमारत बांधण्यासाठी तसेच रिक्त पदे भरण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१४-११-२०१८)** : (१) मराठवाडा विभागामध्ये जिल्हा परिषदेच्या माध्यमिक शाळांची संख्या ३८१ आहे. माध्यमिक शाळेतील वर्ग-२ मुख्याध्यापकांची ३०२ पदे व शिक्षकांची १८६१ पदे मंजूर आहेत. सदर मंजूर पदांपैकी मुख्याध्यापकांची ३०२ पदे रिक्त असून, शिक्षकांच्या रिक्त पदांची संख्या सन २०१८-१९ च्या संचमान्यतेत अतिरिक्त झालेल्या शिक्षकांच्या समायोजनानंतर निर्धारित होईल.

(२) माध्यमिक शाळांना इमारती उपलब्ध आहेत. जिल्हा परिषद, जिल्हा नियोजन विकास समिती व सर्व शिक्षा अभियान यांच्या माध्यमातून शाळांना इमारती उपलब्ध केल्या जातात.

मुख्याध्यापकांची रिक्त पदे पदोन्नतीने भरण्याबाबत आवश्यक ती कार्यवाही करण्यात येत आहे. तसेच राज्यातील स्थानिक स्वराज्य संस्थेच्या सर्व माध्यमाच्या शाळांमधील शिक्षण सेवक भरती ही अभियोग्यता व बुध्दीमत्ता चाचणीतील गुणांच्या आधारे “पवित्र” या संगणकीय प्रणालीच्या माध्यमातून करण्याबाबतची कार्यप्रणाली कार्यान्वित करण्यात आलेली आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मुंबईतील तानसा जल वाहिनीलगत बांधण्यात येणाऱ्या सायकल ट्रॅकबाबत

**(७) ४४७२१ (०१-११-२०१८). श्री.विजय ऊर्फ भाई गिरकर, श्री.प्रविण दरेकर, श्रीमती स्मिता वाघ :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबई महानगरपालिका १०० कोटी रुपये खर्च करून तानसा जलवाहिनी लगत सायकल ट्रॅक उभारणार असल्याचे माहे सप्टेंबर, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, तानसा जलवाहिनी ही संजय गांधी उद्यानातून जात असल्यामुळे येथे सरार्स वन्यजीवांचा वावर असून सुरक्षेच्यादृष्टीने कोणत्या उपाययोजना करण्यात आल्या वा येत आहे,

(३) तसेच अशाच प्रकारे वांद्रे-कुर्ला संकुल येथे बांधण्यात आलेल्या सायकल ट्रॅकचा वापर सायकल स्वारांसाठी होत नसून येथे रिक्षा, टॅक्सीसह अन्य वाहने पार्क केली जात असल्याचे आढळून आले आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे तसेच सुरक्षेच्यादृष्टीने धोकादायक असणाऱ्या सायकल ट्रॅकबाबत शासनाची नेमकी भूमिका काय राहणार आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२२-११-२०१८) :** (१) बृहन्मुंबई महानगरपालिकेमार्फत तानसा व इतर जलवाहिनीलगत सायकल ट्रॅक उभारणी करण्याचा प्रकल्प तीन टप्प्यांमध्ये प्रस्तावित करण्यात आला आहे. सदर प्रकल्पाकरीताच्या टप्पा-१ करीता अंदाजित रुपये १६१.४३ कोटी व टप्पा-२-अ करीता अंदाजित रुपये ११९.८६ कोटी मंजूर करण्यात आले आहेत.

(२) तानसा जलवाहिनी ही भांडुप संकुल येथून जात असून, तेथील वन्यजीवांच्या सुरक्षिततेच्या दृष्टीने उपाययोजना करण्यासाठी नियुक्त करण्यात आलेल्या तांत्रिक सल्लागारामार्फत अभ्यास सुरु असून, त्यानुषंगाने बृहन्मुंबई महानगरपालिकेमार्फत पुढील कार्यवाही सुरु आहे.

(३) व (४) वांद्रे-कुर्ला संकुल येथे बांधण्यात आलेल्या सायकल ट्रॅकचा वापर सायकलस्वारांसाठी होत असून, सायकलस्वारांची संख्या तुरळक असल्यामुळे, सदर सायकल ट्रॅकलगत अनधिकृतपणे वाहने उभी केली जात असल्याचे एमएमआरडीए मार्फत कळविण्यात आले आहे.

तथापि, सदर सायकल ट्रॅकवर अनधिकृतपणे उभ्या केलेल्या वाहनांवर वारंवार कारवाई करण्यात येते.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## वरिष्ठ महाविद्यालयातील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना भविष्य निर्वाह निधीच्या पावत्या देण्याबाबत

**(८) ४४७२५ (२६-१०-२०१८). श्री.विक्रम काळे, श्री.सतिश चव्हाण, श्री.दत्तात्रय सावंत : तारांकित प्रश्न क्रमांक ३८१६५ ला दिनांक ९ मार्च, २०१८ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **उच्च व तंत्र शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मराठवाडा विभागातील औरंगाबाद व नांदेड उच्चशिक्षण सहसंचालक कार्यालयांतर्गत असलेल्या त्या-त्या जिल्हयातील वरिष्ठ महाविद्यालयातील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना त्यांच्या भविष्य निर्वाह निधीच्या पावत्या माहे मार्च, २०१८ पर्यंतच्या देण्यात आलेल्या नाहीत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन संबंधित जिल्हयातील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना भविष्य निर्वाह निधीच्या पावत्या देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१२-११-२०१८) :** (१) हे अंशत: खरे आहे.

(२) व (३) नांदेड विभागातील वरिष्ठ महाविद्यालयातील बहुतांश शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांच्या भविष्य निर्वाह निधीच्या पावत्या तपासून वितरीत करण्याची कार्यवाही करण्यात येत आहे.

तसेच, औरंगाबाद विभागातील वरिष्ठ महाविद्यालयातील बहुतांश शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना मार्च, २०१८ अखेरपर्यंतच्या भविष्य निर्वाह निधीच्या पावत्या वितरीत करण्याची कार्यवाही सुरु आहे.

---

## मुंबईतील विद्याविहार येथील राजावाडी रुग्णालयात आयसीयुचे खाजगीकरण करण्यात आल्याबाबत

**(९) ४४७२६ (०१-११-२०१८). श्री.विजय ऊर्फ भाई गिरकर, श्री.नागोराव गाणार, श्री.प्रविण दरेकर, श्रीमती स्मिता वाघ, श्री.जनार्दन चांदूरकर, श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, ॲड.हुस्नबानू खलिफे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबईतील घाटकोपर येथील राजावाडी रुग्णालयात खाजगी संस्थेकडून चालविण्यात आलेल्या आयसीयु विभागात दिनांक ६ ते १८ ऑगस्ट, २०१८ च्यादरम्यान दाखल करण्यात आलेल्या १८ रुग्णांचा मृत्यू झाल्याची बाब दिनांक २० ऑगस्ट, २०१८ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त ठिकाणी आयसीयुचे खाजगीकरण झाल्यानंतर कायदोपत्री एमबीबीएस, एमडी डॉक्टर नेमणूक केल्याचे दाखवून प्रत्यक्षात मात्र एमबीबीएस ऐवजी बीएमएस, बीएचएमएस तसेच अनुभव नसलेल्या डॉक्टरांची नेमणूक केली जात असल्याने आयसीयु विभागात मृत्यूच्या संख्येत वाढ होत असल्याचे माहे ऑगस्ट, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(३) असल्यास, याबाबत शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व चौकशीनुसार दोषींवर कोणती कारवाई करण्यात आली वा येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२२-११-२०१८) :** (१) बृहन्मुंबई महानगरपालिकेच्या घाटकोपर येथील राजावाडी रुग्णालयात दिनांक ०६/०८/२०१८ ते २९/०८/२०१८ या कालावधीत ७४ रुग्ण आय.सी.यु. मध्ये दाखल झाले असून, त्यापैकी २१ रुग्णांचा मृत्यू झाला आहे ही वस्तुस्थिती आहे.

(२) सदर रुग्णालयाच्या आय.सी.यु. विभागाचे पूर्णपणे खाजगीकरण न करता कंत्राटदाराकडून फक्त तज्ञ डॉक्टरांच्या सेवा घेतल्या जात आहेत व सदर विभागावर महानगरपालिका प्रशासनाचे पूर्ण नियंत्रण असल्याचे महानगरपालिकेमार्फत कळविण्यात आले आहे.

सदर रुग्णालयातील अतिदक्षता व ट्रॉमा विभागामध्ये, ज्या एम.बी.बी.एस. पदवीधारकांनी पदव्युत्तर एम.डी/ डी.एन.बी. वैद्यकशास्त्र/ बधिरीकरण शास्त्र अभ्यासक्रम पूर्ण केला आहे अशा तज्ञ डॉक्टरांच्या सेवा बाह्यस्त्रोतीकरणाद्वारे दिनांक ०६/०८/२०१८ पासून २४ तास महानगरपालिकेमार्फत उपलब्ध करुन देण्यात आल्या आहेत.

(३) सदर प्रकरणी बृहन्मुंबई महानगरपालिकेमार्फत प्राथमिक चौकशी करण्यात आली आहे.

अतिदक्षता विभागात होणारे मृत्यू हे रुग्णांचे वय, त्यांना असलेले आजार व त्यांच्या आजाराची गंभीरता व रुग्णालयात दाखल करतेवेळेची स्थिती यावर अवलंबून असते.

तसेच, सदर रुग्णालयात दिनांक ०६/०८/२०१८ ते २९/०८/२०१८ या कालावधीत मृत्यू झालेल्या रुग्णांपैकी मृत्यूची कारणे साधारणत: अंतिम स्थितीतील कॅन्सर, हृदयविकाराचा तीव्र झटका, रेल्वे व रस्ता अपघात व इतर अत्यवस्थ स्थिती असल्याचे महानगरपालिकेमार्फत कळविण्यात आले आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मुंबईत म्हाडाच्या बहुतांश जमिनीवर अतिक्रमण झाल्यामुळे घरे उभारण्यात होत विलंब होत असल्याबाबत

**(१०) ४४७३३ (३०-१०-२०१८). श्री.विजय ऊर्फ भाई गिरकर, श्री.प्रविण दरेकर, श्रीमती स्मिता वाघ, श्री.गिरीशचंद्र व्यास, श्री.नागोराव गाणार, श्री.विलास पोतनीस :** सन्माननीय **गृहनिर्माण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबईतील म्हाडाच्या बहुतांश जमिनींवर अतिक्रमण झाले असल्यामुळे म्हाडाला गत तीन वर्षात केवळ २५०० घरेच उभारता आल्याचे माहे ऑगस्ट, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, म्हाडाची एकूण जमीन किती क्षेत्रफळ आहे याबाबतची माहिती आठ दिवसांत सादर करण्याचे आदेश म्हाडाच्या अध्यक्षांनी दिनांक १८ सप्टेंबर, २०१८ रोजी वा त्यासुमारास संबंधित अधिकाऱ्यांना दिले आहेत, हे ही खरे आहे काय
(३) असल्यास, शासनाने एक जिल्हाधिकारी, एक तहसिलदार, पाच नायब तहसिलदार अशी पदे गत कित्येक वर्षे न भरल्यामुळे अतिक्रमण निष्कासित करण्याच्या कामात दिरंगाई होत असल्याचे आढळून आले आहे, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुसार म्हाडाची रिक्त पदे लवकरात लवकर भरून म्हाडाच्या जमिनीवरील अतिक्रमणे निष्कासित करुन नवीन घरे उभारण्याबाबत तसेच मुंबई उपनगरातील म्हाडाच्या बैठ्या वसाहतीचा पुनर्विकास करून या ठिकाणी इमारती उभारून अतिरिक्त घरे उपलब्ध होण्याच्यादृष्टीने कोणत्या उपाययोजना केल्या वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.प्रकाश महेता (२०-११-२०१८) :** (१) हे खरे नाही.
(२) हे खरे आहे.
(३) व (४) सदरहू पदे भरण्याबाबत म्हाडाने महसूल विभागास विनंती केलेली आहे.
(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## अन्न पदार्थाच्या (जंक फूड) विक्रीस बंदी असल्याच्या अनुदान आयोगाने दिलेल्या निर्देशाची अंमलबजावणी करण्याबाबत

**(११) ४४७४० (२६-१०-२०१८). श्री.नागोराव गाणार, प्रा.अनिल सोले, श्री.गिरीशचंद्र व्यास, श्री.रामदास आंबटकर, श्री.विजय ऊर्फ भाई गिरकर :** सन्माननीय **उच्च व तंत्र शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय:-

(१) मुंबई तसेच देशभरातील सर्व विद्यापीठे व त्यांच्याशी संलग्न महाविद्यालये आणि अन्य उच्च शिक्षण संस्थांच्या कॅम्पसमध्ये चमचमीत परंतु सत्वहीन अन्न पदार्थाच्या (जंक फूड) विक्रीस पूर्ण बंदी करण्याचे निर्देश विद्यापीठ अनुदान आयोगाने माहे ऑगस्ट, २०१८ च्या चौथ्या आठवड्यात दिल्याचे निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, असा आदेश केंद्रीय मनुष्यबळ विकास मंत्रालयाने दिनांक २० ऑक्टोबर, २०१६ रोजी दिला होता, परंतु त्यानुसार त्याची अंमलबजावणी न झाल्याने आयोगाने जुन्या पत्राचा संदर्भ देत तेच निर्देश नव्याने दिले आहेत, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन विद्यापीठ अनुदान आयोगाने दिलेल्या निर्देशाची अंमलबजावणी करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१३-११-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.
(२) अंशत: खरे आहे. देशभरातील सर्व विद्यापीठे व त्यांच्याशी संलग्न महाविद्यालये आणि अन्य उच्च शिक्षण संस्थांच्या कॅम्पसमध्ये चमचमीत परंतु सत्वहीन अन्न पदार्थाच्या (जंक फूड) विक्रीस पूर्ण बंदी करण्याच्या दिनांक २० ऑक्टोबर, २०१६ रोजी दिलेल्या निर्देशाची अधिक परिणामकारक अंमलबजावणी करण्याचे निर्देश विद्यापीठ अनुदान आयोगाने दिनांक २१ ऑगस्ट, २०१८ च्या पत्रान्वये दिले आहेत.
(३) विद्यापीठ अनुदान आयोगाने दिलेल्या निर्देशाची अंमलबजावणी करण्याच्या अनुषंगाने कुलसचिव, सर्व अकृषी विद्यापीठे व संचालक, उच्च शिक्षण, पुणे यांना शासनाच्या दिनांक १७/११/२०१६ च्या पत्रान्वये महाविद्यालयात विद्यार्थ्यांच्या आरोग्याचा विचार करता जंक फुड वर बंदी घालण्यासाठी आवश्यक ती कार्यवाही करण्याचे निर्देश दिलेले आहेत.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

# मुंबई विद्यापीठातील कर्मचाऱ्यांची भविष्य निर्वाह निधीची रक्कम जमा करण्याबाबत

**(१२) ४४७४४ (२६-१०-२०१८). श्री.नागोराव गाणार, प्रा.अनिल सोले, श्री.गिरीशचंद्र व्यास, श्री.रामदास आंबटकर, श्री.विजय ऊर्फ भाई गिरकर :** सन्माननीय **उच्च व तंत्र शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय:-

(१) मुंबई विद्यापीठाने माहे एप्रिल, २००९ ते डिसेंबर, २०१६ पर्यंतची कर्मचाऱ्यांची भविष्य निर्वाह निधीची (पीएफ) रक्कम जमा न केल्याने भविष्य निर्वाह निधी विभागाच्या सहाय्यक आयुक्त यांनी विद्यापीठाला कारणे दाखवा नोटीस दिल्याचे माहे ऑगस्ट, २०१८ च्या चौथ्या आठवड्यात निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, यामुळे उक्त कालावधीत काम करणाऱ्या हजारो कर्मचाऱ्यांच्या भविष्य निर्वाह निधीचा प्रश्न निर्माण झाला असून शासनाकडून पदांना मंजुरी मिळत नसल्यामुळे मुंबई विद्यापीठाने अनेक विभागामध्ये कंत्राटी कर्मचारी नेमले असल्याने कंत्राटी कर्मचाऱ्यांचे प्रश्न गेल्या अनेक वर्षापासून प्रलंबित आहेत, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कर्मचाऱ्यांची भविष्य निर्वाह निधीची रक्कम जमा करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१३-११-२०१८) :** (१) व (२) हे अंशत: खरे आहे.

कर्मचारी भविष्य निर्वाह निधी कार्यालयामधून प्रवर्तन अधिकारी यांनी मुंबई विद्यापीठास फेब्रुवारी, २०१७ च्या दरम्यान भेट देऊन हंगामी कर्मचाऱ्यांची भविष्य निर्वाह निधी संघटनामध्ये नोंदणी करण्यासाठी मोहिम राबविण्याबाबत माहिती दिली. सदरहू मोहिम दिनांक ०१/०१/२०१७ ते दिनांक ३१/०३/२०१७ या कालावधीत राबविण्यात आली. त्यानुसार १७७२ हंगामी कर्मचाऱ्यांची ईपीएफ मध्ये नोंदणी केली असून नोंदणीकृत सर्व हंगामी कर्मचाऱ्यांचे ईपीएफचे पैसे कर्मचारी भविष्य निर्वाह निधी कार्यालयामध्ये जमा करण्यात येतात.

(३) विद्यापीठाकडून सर्व स्थायी कर्मचाऱ्यांच्या भविष्य निर्वाह निधीचे पैसे नियमितपणे भरले जातात. तसेच दिनांक ०१/०४/२००९ ते दिनांक ३१/१२/२०१६ पर्यंत विद्यापीठात कार्यरत हंगामी कर्मचाऱ्यांची ईपीएफ मध्ये नोंदणी करण्याची प्रक्रिया विद्यापीठ स्तरावर सुरू आहे.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यातील सर्व शाळांमध्ये मुलींच्या सुरक्षिततेसाठी सास्व यंत्रणा राबविण्याबाबत

**(१३) ४४७४९ (०१-११-२०१८). श्री.नागोराव गाणार, प्रा.अनिल सोले, श्री.गिरीशचंद्र व्यास, श्री.विजय ऊर्फ भाई गिरकर :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील सर्व शाळांमध्ये मुलींच्या सुरक्षिततेसाठी सास्व यंत्रणा राबविण्याचे आदेश राज्याच्या बालहक्क आयोगाने जारी केल्याचे माहे सप्टेंबर, २०१८ च्या दुसऱ्या आठवड्यात निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, शासनातर्फे याकरीता विशेष रक्षा अभियान हाती घेण्यात आले असून महानगरपालिका, जिल्हा परिषदा, अनुदानित तसेच विनाअनुदानित शाळांना या आदेशाची अंमलबजावणी सक्तीची करण्यात येणार असून प्रत्येक वर्गातील मुलींची तीनवेळा हजेरी घेणे सक्तीचे करण्यात आले, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, प्रत्येक शाळेच्या प्रवेशद्वारावरील सुरक्षा रक्षकांच्या ताफ्यात महिला सुरक्षा रक्षकाची नेमणूक करण्याचे आदेश शासनाने दिले आहेत, हे खरे आहे काय,
(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सर्व शाळांमध्ये मुलींच्या सुरक्षिततेसाठी सास्व यंत्रणा राबविण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१९-११-२०१८) :** (१) होय.

(२) व (३) विद्यार्थी सुरक्षेच्या अनुषंगाने हे अभियान सुरु करण्यात आले आहे. तथापि, याबाबतची कोणतीही सक्ती शाळांना करण्यात आलेली नाही.

(४) विद्यार्थी सुरक्षिततेसाठी शासन परिपत्रक क्र.संकीर्ण २०१७/प्र.क्र. (१७१/१७)/एसडी-६, दिनांक ०२/०६/२०१८ अन्वये निर्देश दिले आहेत.

(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठात अधिकारी व कर्मचाऱ्यांची रिक्त पदे असल्याबाबत

**(१४) ४४७५१ (३१-१०-२०१८). श्री.नागोराव गाणार, प्रा.अनिल सोले, श्री.गिरीशचंद्र व्यास, श्री.रामदास आंबटकर, श्री.विजय ऊर्फ भाई गिरकर, श्री.अनिल भोसले, श्री.विक्रम काळे :** सन्माननीय **उच्च व तंत्र शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठात अधिकारी व कर्मचाऱ्यांची ३० टक्के रिक्त पदे असून विद्यापीठाने गेल्या चार वर्षापूर्वी ७५ तांत्रिक व १४९ लिपिक अशा २२४ शिक्षकेतर कर्मचाऱ्यांची नियुक्ती करुनही त्यांच्या पदांना शासनाकडून मान्यता मिळाली नसल्याने या कर्मचाऱ्यांच्या नोकऱ्या संकटात आल्याचे माहे सप्टेंबर, २०१८ च्या दुसऱ्या आठवड्यात निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, पुणे विद्यापीठ व संलग्न महाविद्यालयातून यंदाच्या शैक्षणिक वर्षात साडेसात लाख विद्यार्थी शिक्षण घेत आहेत, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठाने विद्यापीठातील मंजूर पदे भरण्यासाठी तसेच शिक्षकेतर कर्मचाऱ्यांच्या पदांना मान्यता देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१९-११-२०१८) :** (१) हे अंशत: खरे आहे.

प्रश्नात नमूद विद्यापीठात सद्य:स्थितीत २६.४१% पदे रिक्त आहेत. तसेच तांत्रिक व लिपिक संवर्गातील पदे नियमित स्वरूपात कार्यरत आहेत.

(२) होय, हे खरे आहे.

(३) वित्त विभागाच्या दिनांक २५/०५/२०१७ च्या शासन निर्णयान्वये सुधारित आकृतिबंध निश्चित झाल्याशिवाय पदे भरण्यास निर्बंध आहेत. त्यानुसार राज्यातील सर्व अकृषी विद्यापीठातील शिक्षक-शिक्षकेतर पदांचा सुधारित आकृतिबंध निश्चित करण्याची कार्यवाही सुरू आहे. तसेच प्रश्नभाग-१ मध्ये नमूद शिक्षकेतर पदांबाबत झालेल्या अनियमिततेसंदर्भात शासनस्तरावरून कार्यवाही सुरू आहे.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## ठाणे जिल्ह्यातील ठाणे-घोडबंदर रस्त्यावरील गायमुख खिंडीदरम्यान दररोज वाहतूक कोंडी होत असल्याबाबत

**(१५) ४४७५३ (३०-१०-२०१८). ॲड.निरंजन डावखरे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) ठाणे जिल्ह्यातील ठाणे-घोडबंदर रस्त्यावरील गायमुख खिंडीदरम्यान दररोज होणाऱ्या वाहतूक कोंडीवर पोलिसांकडून कोणतीही उपाययोजना केली जात नसल्याचे निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर रस्त्याला समांतर फाऊंटन जंक्शन ते गायमुखपर्यंत कोस्टल रोड तयार करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१९-११-२०१८) :** (१) हे खरे नाही.

सदर माहामार्गावर वाहतूक कोंडी न होण्याकरीता दिवस रात्र पोलीस कर्मचाऱ्याची गस्त ठेवण्यात येते. या महामार्गावरील बंद पडलेली वाहने

क्रेनच्या सहाय्याने तात्काळ बाजुला काढुण बंद वाहतूक सुरळीत करण्यात येते. तसेच वाहतूक कोंडी होणार नाही याबाबत खबरदारी घेण्यात येते.
(२) व (३) हे खरे नाही.

फाऊंटन जंक्शन ते गायमुख पर्यंत कोस्टल रोड तयार करण्याचा प्रस्ताव महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळामार्फत प्रस्तावित नाही. परंतु फाऊंटन जंक्शन ते गायमुख या लांबीत होणारी वाहतूक कोंडी सोडविण्यासाठी अस्तित्वातील चारपदरी लांबीत मध्यभागी चारपदरी उन्नतमार्ग बांधण्याच्या प्रस्तावास शासन निर्णय क्र. : खाक्षेस-२०१५/प्र.क्र.४१५/रस्ते-८, दिनांक २४ नोव्हेंबर, २०१७ अन्वये मान्यता दिली असून सदर प्रकल्प कार्यान्वित करण्यासाठी महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळास कार्यान्वयीन यंत्रणा म्हणून घोषित केले आहे. सदर प्रकल्पाचा सविस्तर अहवाल व वन विभागाचा ना-हरकत प्रमाणपत्र इत्यादीची कार्यवाही प्रगतीत आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## शिवकालीन नागला बंदर किल्ल्याचे संवर्धन करण्याबाबत

**(१६) ४४७५८ (२५-१०-२०१८). ॲड.निरंजन डावखरे :** सन्माननीय **सांस्कृतिक कार्य मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) शिवकालीन नागला बंदर किल्ला (जि.ठाणे) वाढत्या अतिक्रमणामुळे उद्ध्वस्त होण्याच्या मार्गावर असल्याचे माहे सप्टेंबर, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी सामाजिक संस्था व दुर्गप्रेमींनी शासनाकडे अनेक तक्रारी केल्या असून किल्ल्यांवरील अतिक्रमणे रोखण्यासाठी पुरातत्व व महसूल विभागाने कोणती कार्यवाही केली,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन नागला बंदर किल्ल्याचे संवर्धन करण्यासाठी कोणती उपाययोजना केली वा करण्यात येत आहे, तसेच या संदर्भात पुरातत्व विभागाकडे प्रस्ताव सादर केला आहे काय,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१३-११-२०१८) :** (१), (२) व (३) अशी बाब निदर्शनास आलेली नाही. तथापि, या प्रकरणी पुरातन वास्तु जतनाच्या निकषांप्रमाणे तपासणी करण्यात येईल व आवश्यक ती पुढील कार्यवाही करण्यात येईल.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## हिंदी रामनगर प्राथमिक शाळा, कल्याण (जि.ठाणे) या शाळेची आरटीईची मान्यता रद्द केल्याबाबत

**(१७) ४४७६१ (२६-१०-२०१८). ॲड.निरंजन डावखरे, श्री.नागोराव गाणार :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) हिंदी रामनगर प्राथमिक शाळा, कल्याण (जि.ठाणे) ही संस्था आरटीई नियमानुसार पूर्तता करत नसल्याने सदर शाळेची आरटीईची मान्यता रद्द करण्याबाबत कारवाई करण्यात आली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर संस्थेत शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांचे शैक्षणिक नुकसान टाळण्यासाठी त्यांचे समायोजन इतर शाळेत केले आहे काय, तसेच शाळेतील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी यांचे सुद्धा इतरत्र समायोजन करण्यात आले आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सदर शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी यांना इतरत्र समायोजन होईपर्यंत वेतन अदा करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१३-११-२०१८) :** (१) शासनाची पूर्वमान्यता न घेता शाळा अन्य ठिकाणी भरविण्यात येत असल्याने तसेच बालकांचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा अधिकार अधिनियम, २००९ मधील तरतुदीनुसार भौतिक सुविधांची व मानकांची पूर्तता करीत नसल्याने प्रशासन अधिकारी, कल्याण-डोंबिवली महानगरपालिका, शिक्षण विभाग, कल्याण यांनी शाळेची आरटीई मान्यता रद्द केली आहे.
(२) याबाबतची कार्यवाही करण्यात येत आहे.

(३) शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी यांचे वेतन नियमितपणे सुरू आहे.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## गडचिरोली जिल्हयात मनरेगाच्या कामात गैरव्यवहार झाल्याबाबत

**(१८) ४४७८३ (०३-११-२०१८). श्री.गिरीशचंद्र व्यास, प्रा.अनिल सोले, श्री.नागोराव गाणार, श्री.रामदास आंबटकर :** सन्माननीय **रोजगार हमी मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) गडचिरोली जिल्हयात महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेंतर्गत (मनेरगा) कामात निविदा प्रक्रिया न राबविता मर्जीतील कंत्राटदारांना नियमबाहय कामे दिली गेल्याने सदर कामात मोठ्या प्रमाणात गैरव्यवहार झाल्याचे दिनांक १४ सप्टेंबर, २०१८ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने दोषींवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.जयकुमार रावल (१९-११-२०१८) :** (१) नाही, हे खरे नाही.
(२) जिल्हाधिकारी गडचिरोली यांच्याकडून प्राप्त माहितीनुसार सदर प्रकरणी साहित्याची खरेदी ही नियमानुसार निविदाव्दारे मान्य पुरवठादाराकडून करण्यात आली आहे. सदर प्रकरणी कोणताही गैरव्यवहार झालेला नाही.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## देवरूख (जि.रत्नागिरी) येथील श्री सदगुरू लोकमान्य वाचनालयास अनुदान वितरीत करण्याबाबत

**(१९) ४४८१६ (३१-१०-२०१८). ॲड.निरंजन डावखरे :** सन्माननीय **उच्च व तंत्र शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) सार्वजनिक वाचनालयांना १०० वर्षे पूर्ण झाल्यास त्यांना शासनाकडून रुपये ५ लक्ष विशेष अनुदान मिळत असून देवरूख (जि.रत्नागिरी) येथील श्री सदगुरू लोकमान्य वाचनालय हे अ वर्ग शासन मान्य वाचनालय असून त्याची सुरुवात १९११ च्या दरम्यान झाली असून सदर वाचनालयाला १०० वर्षे पूर्ण झाली असल्याने वाचनालयाने सन २०१३ मध्ये विशेष अनुदान मिळण्याबाबतचा प्रस्ताव शासनाकडे सादर केला होता, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदरहू वाचनालयास अनुदान न मिळण्याची कारणे काय आहेत तसेच कोकण विभागातील १०० वर्षे पूर्ण झालेल्या शासन मान्य सार्वजनिक वाचनालयांना शासनाचे विशेष अनुदान मिळण्याबाबत लोकप्रतिनिधींनी मा.उच्च व तंत्र शिक्षण मंत्री यांना दिनांक २१ सप्टेंबर, २०१८ रोजी निवेदन देऊन मागणी केली आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन उक्त मागणीनुसार वाचनालयाला अनुदान वितरीत करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१७-११-२०१८) :** (१), (२) व (३) दिनांक २१ सप्टेंबर, २०१८ रोजीचे लोकप्रतिनिधीचे निवेदन प्राप्त झाले आहे. तसेच श्री सदगुरू लोकमान्य वाचनालय, देवरूख (जि.रत्नागिरी) व इतर शतायु ग्रंथालयांना अनुदान देण्याबाबतचा प्रस्ताव प्राप्त आहे. तथापि, शतायु ग्रंथालयांना अनुदान देण्याची शासनाची कोणतीही योजना नसल्याने सदर प्रस्तावास मान्यता देण्यात आली नाही.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## इयत्ता ११ वी च्या अपात्र ठरलेल्या तुकड्यांचे फेर मुल्यमापन करण्याबाबत

**(२०) ४४८१८ (०१-११-२०१८). ॲड.निरंजन डावखरे :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) उच्च माध्यमिक स्तरावरील इयत्ता ११ वी च्या शैक्षणिक वर्ष सन २००८-०९ व २००९-१० या वर्षात अनुदानास अपात्र ठरलेल्या जादा तुकड्यांचे फेर मुल्यमापन करण्याबाबत लोकप्रतिनिधींनी मा.शालेय शिक्षण मंत्री यांना दिनांक ११ सप्टेंबर, २०१८ रोजी निवेदन देऊन मागणी केली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन अनुदानास अपात्र ठरलेल्या तुकड्यांचे फेर मुल्यमापन करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१९-११-२०१८) :** (१) होय, यासंदर्भात आवश्यक कार्यवाही सुरु आहे.
(२) व (३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## आर.सी.काळे प्राथमिक विद्यामंदिर, पेढे परशुराम (ता.चिपळूण, जि.रत्नागिरी) शाळेच्या नैसर्गिक वाढीव तुकड्यांच्या मान्यतेबाबत

**(२१) ४४८१९ (०१-११-२०१८). ॲड.निरंजन डावखरे, श्री.नागोराव गाणार :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) भगवान परशुराम पंचक्रोशी शिक्षण मंडळ संचलित आर.सी.काळे प्राथमिक विद्यामंदिर, पेढे परशुराम (ता.चिपळूण, जि.रत्नागिरी) या शाळेच्या वर्ग १ ब च्या वर्गाला २०००-०१ मध्ये मान्यता मिळालेली असून पुढील शैक्षणिक वर्षात अनुक्रमे २ री, ३ री व ४ थी ब च्या तुकड्यांना सन २००१-०२ पासून नैसर्गिक वाढीने मान्यता देण्याबाबत शिक्षण उपसंचालक, शिक्षण संचालक यांनी वारंवार स्मरणपत्रे देऊन सुद्धा शालेय शिक्षण विभागाच्या निष्काळजीपणामुळे सदर शाळेला नैसर्गिक वाढीव तुकड्यांच्या मान्यतेबाबत वंचित ठेवण्यात आल्याचे निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, त्यामुळे वर्षानुवर्षे सदर शाळेवर काम करणारे कर्मचारी व शिक्षण घेणारे विद्यार्थी यांच्यावर अन्याय होत असून शालेय शिक्षण

विभागाच्या निष्काळजीपणामुळे सन २००१ पासून भगवान परशुराम पंचक्रोशी शिक्षण मंडळ (ता.चिपळुण, जि.रत्नागिरी) संचलित आर.सी. काळे प्राथमिक विद्यामंदिर, पेढे परशुराम या शाळेची नैसर्गिक वाढीव तुकड्यांची मान्यता प्रलंबित असल्याबाबत लोकप्रतिनिधींनी मा.शालेय शिक्षण मंत्री यांना दिनांक ७ जुलै, २०१८ रोजी निवेदन देऊन मागणी केली आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन शाळेच्या नैसर्गिक वाढीव तुकड्यांच्या मान्यतेबाबत कार्यवाही करुन नैसर्गिक वाढीच्या प्रस्तावावर दिरंगाई करणाऱ्या अधिकाऱ्यांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१९-११-२०१८) :** (१) हे खरे नाही.
(२) याबाबतचे दिनांक ०७/०९/२०१८ रोजीचे निवेदन प्राप्त झाले आहे.
(३) व (४) याबाबत तपासणी करुन आवश्यक कार्यवाही करण्यात येत आहे.

---

## पंडित दिनदयाळ उपाध्याय ग्राम ज्योती योजनेंतर्गत वीज केंद्राचे काम अपूर्ण असल्याबाबत

**(२२) ४४८२३ (०२-११-२०१८). प्रा.जोगेन्द्र कवाडे, श्री.नागोराव गाणार : तारांकित प्रश्न क्रमांक ४२०३१ ला दिनांक १० जुलै, २०१८ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **ऊर्जा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) अडपल्ली माल (जि.गडचिरोली) येथील सुभाष ग्राम येथे शासनाच्या पंडित दिनदयाळ उपाध्याय ग्राम ज्योती योजनेंतर्गत ३३/११ के.व्ही.विद्युत उपकेंद्राला मंजूरी देऊन एक वर्षाचा कालावधी उलटूनही वीज केंद्राचे काम अतिशय संथगतीने सुरु असल्याची बाब माहे सप्टेंबर, २०१८ च्या शेवटच्या आठवड्यात निदर्शनास आली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त काम हे मे.विश्वनाथ प्रोजेक्ट लिमिटेड या कंपनीला दिनांक १० ऑक्टोबर, २०१७ रोजी वा त्यासुमारास देऊन एक वर्षात पूर्ण करण्याचे वर्क ऑर्डरद्वारे आदेश दिले होते, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, कंपनीने सद्य:स्थितीत हे काम २५% ही पूर्ण केलेले नसल्याने कंपनीकडून सव्याज कामाचे संपूर्ण पैसे वसूल करुन अन्य कंपनीला हे काम हस्तांतरीत करण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली व सदरहू उपकेंद्राचे काम कधीपर्यंत पूर्ण होणे अपेक्षित आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रशेखर बावनकुळे (१९-११-२०१८) :** (१) हे खरे आहे.
(२) हे खरे आहे.
(३) कंत्राटदाराचे काम संथगतीने सुरू असल्याने, त्यांना निविदेतील अटी व शर्ती यांच्या अधीन राहून, महावितरण कंपनीमार्फत “नोटीस टू करेक्ट” देण्यात आल्या आहेत. सद्य:स्थितीत उपकेंद्राचे काम प्रगतीपथावर असून ते डिसेंबर, २०१८ अखेर पूर्ण होणे अपेक्षित आहे.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## नागपूर जिल्ह्यातील ग्रामीण भागातील रस्त्यांच्या दुरूस्तीबाबत

**(२३) ४४८४७ (०५-११-२०१८). श्री.गिरीशचंद्र व्यास, प्रा.अनिल सोले, श्री.नागोराव गाणार, श्री.रामदास आंबटकर :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) नागपूर जिल्ह्यातील ग्रामीण भागामध्ये दिनांक ६ जुलै, २०१८ रोजी वा त्यासुमारास झालेल्या पावसाच्या अतिवृष्टीमुळे रस्त्यांची दुरवस्था झाली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, जिल्हा परिषद नागपूर विभागाने शासनास आपला अहवाल सादर केला असून रस्त्यांच्या दुरूस्तीकरीता निधीची मागणी केली आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन निधी उपलब्ध करुन देण्याबाबत कोणती कार्यवाही केली तसेच निधी किती कालावधीत उपलब्ध होणार आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (२०-११-२०१८) :** (१) व (२) होय, हे खरे आहे.
(३) नागपूर जिल्ह्यातील अतिवृष्टीमुळे क्षतीग्रस्त झालेल्या रस्त्यांच्या दुरुस्तीकरीता निधीच्या मागणीचा प्रस्ताव जिल्हाधिकारी, नागपूर यांच्याकडे जिल्हा परिषदेने सादर केला आहे. तसेच रस्ते व पुल दुरुस्ती परिरक्षण कार्यक्रमांतर्गत जिल्हा परिषद नागपूर करीता सन २०१८-१९ मध्ये रुपये ५.८८ कोटी तर जिल्हा वार्षिक योजनेंतर्गत इतर जिल्हा मार्ग व ग्रामीण मार्ग यांच्या देखभाल दुरुस्तीकराता एकूण रुपये ५८.४८ कोटी इतक्या निधीची तरतूद करण्यात आली आहे.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## ठाणे शहरातील सोहम बिल्डर्सने गैरव्यवहार केल्याबाबत

**(२४) ४४८५७ (०२-११-२०१८). प्रा.जोगेन्द्र कवाडे : तारांकित प्रश्न क्रमांक ३८५०० ला दिनांक २१ मार्च, २०१८ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) ठाणे शहरातील सोहम बिल्डर्सचे मालक चैतन्य पारेख व नरेंद्र शहा यांनी एका जागेवर मंजूर झालेला विकास प्रस्ताव असताना दुसऱ्या जागेवर पुनर्विकास प्रस्ताव मंजूर करुन एफएसआय वापरुन तसेच टोलेजंग इमारती बांधून सुमारे २०० कोटी रुपयांचा गैरव्यवहार केल्याप्रकरणी शासनाने आयुक्त, ठाणे महानगरपालिका यांच्याकडून अहवाल मागविला आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर अहवाल शासनास प्राप्त झाला आहे काय, अहवालाच्या अनुषंगाने शासनाने सोहम बिल्डर्सवर कोणत्या स्वरुपाची कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(३) अद्याप अहवाल सादर झाला नसल्यास विलंबाची कारणे काय आहेत तसेच आयुक्त, ठाणे महानगरपालिका यांना अहवाल तात्काळ शासनाकडे सादर करण्याबाबत कोणते निदेश देण्यात आले आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१९-११-२०१८) :** (१) यासंदर्भात शासनाने आयुक्त, ठाणे महानगरपालिका यांचा अहवाल मागितलेला आहे.
(२) व (३) आयुक्त, ठाणे महानगरपालिका यांनी विकास प्रस्तावात वापरलेल्या भूखंडाचा भूनिर्देशांक अन्य कोणत्याही विकास प्रस्तावात वापरला नसल्याचे शासनास कळविले आहे. सदर बाबींची पडताळणी करुन शासनाकडून अंतिम निर्णय संकल्पित आहे.

---

**भिवंडी (जि.ठाणे) येथील अनधिकृत गोदामांवर कारवाई करण्याबाबत**

**(२५) ४४८५८ (३०-१०-२०१८). प्रा.जोगेन्द्र कवाडे : तारांकित प्रश्न क्रमांक ३८१०८ ला दिनांक २८ फेब्रुवारी, २०१८ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) भिवंडी (जि.ठाणे) येथील अनधिकृत गोडाऊन (वेअर हाऊस) वर कारवाई करण्याबाबत ठाणे पोलीस आयुक्तालय अंतर्गत परिमंडळ-२ च्या नारपोली पोलीस स्टेशनच्या हद्दीमधील एकूण १८ गावांतील गोडाऊन परिसरामध्ये बेकायदेशीर ज्वलनशील पदार्थांची साठवणूक करणाऱ्या गोडाऊनची माहिती प्राप्त करुन कारवाई करण्याबाबत जॉइंट चिफ कन्ट्रोलर, एक्सप्लोसिव्ह, नवी मुंबई यांना सूचना देण्यात आल्या होत्या, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सहायक नियंत्रण, अनधिकृत बांधकाम, भूमी व मिळकत शाखा, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, उपप्रादेशिक कार्यालय,ठाणे यांनी १४८ प्रकरणांमध्ये संबंधितावर बजावलेल्या नोटीसाबाबत कोणती कारवाई करण्यात आली तसेच ५२ प्रकरणांच्या निष्कासनाची सुरू करण्यात आलेली कारवाई पूर्ण झाली आहे काय,
(३) असल्यास, फक्त नोटीस देण्याव्यतिरिक्त कोणती कारवाई न करणाऱ्या संबंधित विभागांच्या अधिकारी व कर्मचाऱ्यांविरुध्द शासनाने कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१९-११-२०१८) :** (१) हे खरे आहे.
(२) व (३) मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाने १४८ प्रकरणामध्ये संबंधितावर बजावण्यात आलेल्या नोटीस प्रकरणातील ९४ प्रकरणाबाबत कार्यवाही प्रगतीपथावर आहे. २ प्रकरणी मा.न्यायालयाचे स्थगिती आदेश आहेत. उर्वरित ५२ प्रकरणापैकी २ प्रकरणामध्ये निष्कासन कार्यवाही केली आहे.

अनधिकृत बांधकामे नियमित करण्याबाबत शासनाने धोरण निश्चित केले आहे. त्या अनुषंगाने प्राधिकरणाने दिनांक २१/०२/२०१८ रोजी नोटीस प्रदर्शित करून शासनाच्या धोरणानुसार जी बांधकामे नियमित करता येतील अशा बाबत ६ महिने कालावधीत म्हणजे दिनांक २०/०८/२०१८ पर्यंत अर्ज सादर करण्याचे आवाहन केले आहे. त्यास दिनांक ०३/१०/२०१८ अन्वये दिनांक २१/११/२०१८ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली आहे. या धोरणानुसार प्राप्त झालेल्या अर्जाची प्राधिकरणाकडून छाननी करून आवश्यक कार्यवाही करण्यात येत आहे. त्यानंतर जी बांधकामे नियमित होवू शकणार नाहीत ती अनधिकृत बांधकामे निष्कासित करण्याची कार्यवाही करण्यात येईल.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## उल्हासनगर (जि.ठाणे) मनपाच्या शालेय पोषण आहारात उंदराची विष्ठा सापडल्याबाबत

**(२६) ४४८६६ (०२-११-२०१८). ॲड.राहुल नार्वेकर, श्री.आनंद ठाकूर, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.शरद रणपिसे, ॲड.रामहरी रुपनवर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) उल्हासनगर (जि.ठाणे) मनपाच्या शाळा क्र. २१ मध्ये शालेय पोषण आहारात उंदराची विष्ठा सापडल्याचे एका विद्यार्थीनीने निदर्शनास आणून दिल्याने माहे ऑगस्ट, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीचे निष्कर्ष काय आहेत व त्यानुसार दोषींवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२२-११-२०१८) :** (१) दिनांक २ ऑगस्ट, २०१८ रोजी उल्हासनगर महानगरपालिका हिंदी माध्यमाच्या शाळा क्रमांक २१ या शाळेत करण्यात आलेल्या शालेय पोषण आहारात उंदराची विष्ठा दिसून आली ही वस्तुस्थिती आहे.

(२) व (३) सदर प्रकरणी उल्हासनगर महानगरपालिकेमार्फत चौकशी करण्यात आली आहे.

सदर शालेय पोषण आहाराची तपासणी पब्लिक हेल्थ लॅबोरेटरी, नवी मुंबई यांचेमार्फत करण्यात आली असून, सदर पोषण आहार "माणसाच्या खाण्याकरीता योग्य नाही" असा अहवाल पब्लिक हेल्थ लॅबोरेटरी, नवी मुंबई यांनी दिला आहे.

सदर प्रकरणी शालेय पोषण आहार पुरविणाऱ्या महिला मंडळाचे कंत्राट उल्हासनगर महानगरपालिकेमार्फत रद्द करण्यात आले असून, यापुढे अशा प्रकारच्या घटना घडणार नाहीत याबाबत उल्हासनगर महानगरपालिकेमार्फत सर्वतोपरी काळजी घेण्यात येत आहे.

---

## मुंबई शहरात आग लागण्याच्या घटनांमध्ये वाढ होत असल्याबाबत

**(२७) ४४८७० (०२-११-२०१८). ॲड.राहुल नार्वेकर, श्री.आनंद ठाकूर, श्री.जनार्दन चांदूरकर, श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, ॲड.हुस्नबानू खलिफे, श्री.किरण पावसकर, श्री.हेमंत टकले, श्री.धनंजय मुंडे, श्री.नागोराव गाणार, प्रा.अनिल सोले, श्री.गिरीशचंद्र व्यास, श्री.रामदास आंबटकर, श्री.विजय ऊर्फ भाई गिरकर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबई शहरात आग लागण्याच्या घटनांमध्ये दिवसेंदिवस वाढ होत असून गत सहा महिन्यात मुंबई महापालिकेच्या इमारत व कारखाना विभागाने तब्बल चारशे उपाहारगृहांना सुरक्षेची पाहणी न करताच परवानगी दिल्याची बाब माहे ऑगस्ट, २०१८ च्या तिसऱ्या सप्ताहात निदर्शनास आली आहे, हे खरे आहे काय,

(२) तसेच मुंबई शहरातील तीन हजार इमारतीमध्ये अग्निशमन यंत्रणेचा अभाव असल्याचे अग्निशमन दलाने माहे ऑगस्त, २०१८ च्या चौथ्या

आठवड्यात केलेल्या फायर ऑडिटमध्ये सदर बाब निदर्शनास आली आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व तद्नुसार यापूर्वी झालेल्या कमला मिल आगीच्या दुर्घटनेची पुनरावृत्ती होऊ नये याची दखल घेऊन पाहणी न करता परवानगी दिलेल्या अधिकाऱ्यांवर शासनाने कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे तसेच उक्त ठिकाणी इमारतीमध्ये राहणाऱ्या नागरिकांच्या सुरक्षेच्यादृष्टीने कोणती उपाययोजना केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२२-११-२०१८) :** (१) बृहन्मुंबई महानगरपालिका क्षेत्रातील १७४ उपाहारगृहांना मागील सहा महिन्यांत महानगरपालिकेच्या इमारत व कारखाने विभाग तसेच, अग्निशमन विभागाचे ना-हरकत प्रमाणपत्र प्राप्त झाल्यानंतर, महानगरपालिकेच्या आरोग्य विभागामार्फत परवाने देण्यात आल्याचे महानगरपालिकेमार्फत कळविण्यात आले आहे.
(२), (३) व (४) सन २०१५ ते सप्टेंबर, २०१८ या कालावधीत बृहन्मुंबई महानगरपालिकेच्या हद्दीतील ५८०४ इमारतींमधील अग्निसुरक्षा उपाययोजनांची पाहणी करण्यात आली असून, त्यापैकी २९४२ इमारतींच्या अग्निसुरक्षा उपाययोजनांमध्ये त्रुटी असल्याचे बृहन्मुंबई महानगरपालिकेच्या निदर्शनास आले आहे.

सदर २९४२ इमारतींना महाराष्ट्र आग प्रतिबंधक व जीवसंरक्षक उपाययोजना अधिनियम २००६ अन्वये नोटीस बजावून त्यांना ठराविक मुदतीमध्ये त्रुटींची पुर्तता करण्याचे निर्देश बृहन्मुंबई महानगरपालिकेमार्फत देण्यात आले.

सदर इमारतींपैकी २९२४ इमारतींनी त्यांना दिलेल्या मुदतीत अग्निसुरक्षा उपाययोजनांच्या त्रुटींची पुर्तता केली आहे.

ज्या १८ इमारतींनी त्रुटींची पुर्तता केली नाही त्या इमारतींविरोधात बृहन्मुंबई महानगरपालिकेमार्फत खटले दाखल करण्यात आले आहेत.

अग्निसुरक्षा कायद्याची अंमलबजावणी करण्यासाठी अग्निशमन दलामार्फत महानगरपालिकेच्या २४ विभाग कार्यालयांत नव्याने अग्निसुरक्षा

पालन कक्षाची स्थापना करण्यात आली असून, सदर कक्षामार्फत मुंबई शहरातील विविध आस्थापनांची तपासणी करुन कारवाई केली जाते.

---

## मुंबईतील झोपडीधारकांना दररोज दरडोई ९० लिटर पाणी देण्याच्या मागणीबाबत

**(२८) ४४९३४ (०२-११-२०१८). श्री.अमरिशभाई पटेल, श्री.शरद रणपिसे, ॲड.रामहरी रुपनवर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबईतील झोपडीधारकांना दररोज दरडोई ९० लिटर्स पाणी देण्याच्या मागणीबाबतचा ठराव माहे जानेवारी, २०१८ मध्ये महानगरपालिका सभागृहात एकमताने मंजूर करण्यात आला असून महापालिकेच्या जलअभियंता विभागाने सदर ठराव फेटाळत दरडोई फक्त ४५ लिटर्सच पाणी देण्यात येणार असल्याचे स्पष्ट केल्यामुळे झोपडीधारकांना कमी पाण्यातच आपला दिनक्रम चालवावा लागणार असल्याचे माहे ऑगस्ट, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, जागतिक आरोग्य संघटनेच्या मानकानुसार प्रतिमाणसी १८० लिटर्स पाण्याचा पुरवठा करणे आवश्यक असून सध्या केवळ ४५ लिटर्स पाण्याचा पुरवठा करण्यात येत असल्याने अनेक मोठ्या घरांमध्ये पाण्याचा तुटवडा भासत असल्याचे निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुसार कोणती कार्यवाही करण्यात आली वा येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२२-११-२०१८) :** (१) व (२) जागतिक आरोग्य संघटनेच्या संकेतस्थळावर उपलब्ध माहितीनुसार, मूलभूत व आरोग्याच्या दृष्टीने आवश्यक गरज भागविण्यासाठी प्रतिमाणसी ५० ते १०० लीटर पाणी लागते.

राष्ट्रीय मानकानुसार, शहरी भागात सामायिक नळखांबाद्वारे पाणीपुरवठा करण्यात येणाऱ्या ठिकाणी दरडोई ४० लीटर प्रतिदिन या प्रमाणात पाणीपुरवठा करण्याचे निर्देशित केले आहे.

तथापि, मुंबईतील झोपडपट्टीवासियांना महानगरपालिकेमार्फत सामायिक नळखांबाद्वारे प्रतिदिन प्रतिमाणसी ४५ लीटर पाणीपुरवठा करण्यात येतो.

झोपडपट्टी पुनर्वसन योजनेंतर्गत हे झोपडपट्टीधारक इमारतींमध्ये रहावयास गेल्यावर त्यांना महानगरपालिकेमार्फत प्रतिदिन प्रतिमाणसी १३५ लीटर पाणीपुरवठा करण्यात येतो.

(३) सध्या शोषण टाकी असलेल्या इमारतींना बृहन्मुंबई महानगरपालिकेमार्फत दरडोई १३५ लीटर प्रतिदिन प्रमाणे पाणीपुरवठा केला जात आहे.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## घाटी रुग्णालयासाठी नवीन दोन सी.टी.स्कॅन मशीन उपलब्ध करुन देण्यासाठी व औषधीचा पुरवठा वेळेवर करण्याबाबत

**(२९) ४४९३८ (०३-११-२०१८). श्री.सतिश चव्हाण, श्री.विक्रम काळे :** सन्माननीय **वैद्यकीय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) औरंगाबाद येथील शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय (घाटी) येथे दोन सी.टी. स्कॅन मशीन बंद आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सन २०१५ मध्ये बंद पडलेली सी.टी.स्कॅन मशीन सन २०१६ मध्ये दुरुस्ती केली असून त्यास रुपये ७० लक्ष खर्च करण्यात आला व आता दुरुस्तीसाठी पैसे नसल्याने मशीन बंद आहे तसेच घाटी रुग्णालयातील ७६ पैकी ३३ व्हेन्टीलेटर बंद आहेत, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, घाटी रुग्णालयात वेळेवर औषधी पुरवठा होत नसल्याने, नेहमीच औषधाची टंचाई असल्यामुळे गरिब रुग्णांना औषधी मिळत नाही, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, घाटी रुग्णालयासाठी नवीन दोन सी.टी.स्कॅन मशीन उपलब्ध करुन देण्यासाठी, व्हेन्टीलेटर सुरु करण्याबाबत व औषधीचा पुरवठा वेळेवर करण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीष महाजन (२०-११-२०१८) :** (१), (२) व (३) हे खरे नाही.
(४) घाटी रुग्णालयासाठी नविन आधुनिक १२८ स्लाईस सी.टी.स्कॅन खरेदीस प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. तसेच सन २०१८-१९ या वित्तीय वर्षात ६ व्हेन्टीलेटर खरेदी करण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे.

स्थानिक स्तरावर औषधांचा तुटवडा भासू नये यासाठी औषधांच्या स्पॉट खरेदीची मर्यादा रुपये ५०००/- वरुन रुपये १,००,०००/- प्रतिदिन वाढविण्यात आली आहे. तसेच संचालनालयाने तातडीच्या प्रसंगी स्वीय प्रपंजी खात्यातून विहित पध्दतीने औषधे खरेदीस परवानगी दिलेली आहे. त्याचप्रमाणे संचालनालयाच्या औषधी व सामुग्रीच्या खरेदीच्या दरकरारांना मुदतवाढ देण्याच्या प्रस्तावावर कार्यवाही करण्यात येत आहे.
(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## गेवराई (जि.बीड) पंचायत समिती येथे मग्रारोहयोच्या कुशल कामाच्या निधीमध्ये गैरव्यवहार झाल्याबाबत

**(३०) ४४९४२ (०३-११-२०१८). श्री.सतिश चव्हाण, श्री.विक्रम काळे : तारांकित प्रश्न क्रमांक ४१७२४ ला दिनांक १२ जुलै, २०१८ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **रोजगार हमी मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय:-
(१) गेवराई (जि.बीड) पंचायत समितीसह इतर ठिकाणी बोगस कामे दाखवून निधी हडप करण्याच्या तक्रारी माहे सप्टेंबर, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान जिल्हाधिकारी, बीड यांच्याकडे लोकप्रतिनिधींनी दिल्या आहेत, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, गेवराई पंचायत समिती अंतर्गत मग्रारोहयो मधील कुशल कामाच्या निधीमध्ये गैरव्यवहार झाल्या प्रकरणी संबंधितांविरुध्द तात्काळ गुन्हा दाखल करण्याचे आदेश दिले होते, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, शासनाच्या विक्रीकर विभागाला कळवून बनावट व्हॅट आणि जीएसटी नंबर टाकून शासनाची फसवणुक करणे, कर चुकविणे आदी प्रकरणात रोहयो विभागाने कोणती कार्यवाही केली आहे,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी गुन्हा दाखल करण्यात आला आहे काय, त्याची सद्य:स्थिती काय आहे, तसेच दोषींविरुध्द कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.जयकुमार रावल (२०-११-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.
(२) होय, हे खरे आहे.
(३) व (४) सदर प्रकरणी दोषींवर फौजदारी गुन्हा दाखल करण्याची कार्यवाही सुरु आहे.
(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## सोयगांव (जि.औरंगाबाद) तालुक्यातील तीन आरोग्य केंद्रातील पदे रिक्त असल्याबाबत

**(३१) ४४९४५ (०५-११-२०१८). श्री.सतिश चव्हाण, श्री.विक्रम काळे :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) सोयगांव (जि.औरंगाबाद) तालुक्यातील ८६ गावांकरीता जरंडी, बनोटी व सावळदबारा ही तीन आरोग्य केंद्र असून तेथे आरोग्य कर्मचाऱ्यांची मंजूर ५१ पदांपैकी ३९ पदे रिक्त असून १२ कर्मचारी कार्यरत आहेत, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, ग्रामीण भागातील विशेष करुन प्रसुतीसाठी महिला रुग्णांना आरोग्य सेवा मिळत नसल्याने खाजगी रुग्णालयात आर्थिक भुर्दंड सहन करुन उपचार घ्यावा लागतो, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने रिक्त असलेली ३९ पदे तात्काळ भरण्यासाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (२०-११-२०१८) :** (१) अंशत: खरे आहे.
(२) नाही.

सदर तिनही आरोग्य केंद्रामध्ये आरोग्य सेवक (महिला) यांची पदे भरण्यात आलेली असल्याने प्रसुतीसाठी आलेल्या महिलांना आरोग्य सेवा पुरवण्यात येते. गरज भासल्यास तातडीच्या उपचारासाठी शासकीय रुग्णवाहिकेव्दारे रुग्णास इतर शासकीय रुग्णालयात हलविण्यात येते.

(३) वित्त विभागाच्या दिनांक १६ मे, २०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये पदभरतीवर घालण्यात आलेले निर्बंध उठविण्यात आलेले असून जुन्या आकृतिबंधानुसार गट-क व गट-ड संवर्गातील १०० टक्के पदभरती करण्यास प्रशासकीय विभागांना मान्यता देण्यात आली आहे. सदर शासन निर्णयानुसार पदभरतीची कार्यवाही करण्यात येत आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## ठाणे येथील वर्तकनगर पोलीस ठाण्याचे पोलीस कॉन्स्टेबल व त्यांचे साथीदार यांनी अक्कलकुवा येथील रिजवान मेननचे अपहरण केल्याबाबत

**(३२) ४४९५४ (०६-११-२०१८). श्री.अमरिशभाई पटेल, श्री.शरद रणपिसे, ॲड.रामहरी रुपनवर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) ठाणे येथील वर्तकनगर पोलीस ठाण्याचे जनतेचे रक्षक असणाऱ्या पोलीस कॉन्स्टेबल दीपक वैरागडे व त्यांचे साथीदार सोहेल पंजाबी यांनी अक्कलकुवा येथील रिजवान मेननचे खंडणीसाठी अपहरण केल्याचे माहे ऑगस्ट, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुसार दोषींवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१९-११-२०१८) :** (१) होय, खरे आहे.

तथापि, सदर प्रकरण माहे जुलै, २०१८ मध्ये घडलेले आहे.

(२) सदर प्रकरणी दिनांक ११/०७/२०१८ रोजी वर्तकनगर पोलीस ठाण्यात गु.र.नं. १५३/१८ भा.दं.वि. कलम ३४७, ३६५, ३८८, ५०४, ५०६, ३४ प्रमाणे गुन्हा दाखल करण्यात आला आहे.

सदर गुन्हयात दिपक निवृत्ती वैरागड, पोलीस शिपाई व सोहेल शब्बीर राजपुत सह अन्य दोन जणांना अटक करण्यात आली आहे.

दिपक निवृत्ती वैरागड, पोलीस शिपाई याचेविरुध्द गुन्हा दाखल झाल्याने त्यास दिनांक ११/०७/२०१८ च्या आदेशान्वये निलंबित करण्यात आले आहे.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## कॉर्पोरेशन बँकेत (ता.नरखेड, जि.नागपूर) शेतकऱ्यांच्या नावाने परस्पर कर्ज उचलून कोट्यवधी रुपयांचा गैरव्यवहार केल्याबाबत

**(३३) ४५०१६ (२६-१०-२०१८). श्री.जयंत पाटील, श्रीमती विद्या चव्हाण, श्री.हेमंत टकले, श्री.किरण पावसकर, ॲड.राहुल नार्वेकर, ॲड.हुस्नबानू खलिफे, श्री.धनंजय मुंडे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.विक्रम काळे, डॉ.सुधीर तांबे, श्री.दत्तात्रय सावंत, श्री.नागोराव गाणार, प्रा.अनिल सोले, श्री.गिरीशचंद्र व्यास, श्री.विजय ऊर्फ भाई गिरकर, श्री.रामदास आंबटकर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नरखेड तालुक्यात (जि.नागपूर) येथील कॉर्पोरेशन बँकेत ४३ शेतकऱ्यांच्या नावाने प्रत्येकी ५० ते ६० लाखाचे कर्ज परस्पर घेऊन तसेच भूमिहीन शेतमजूरांच्या नावानेही कर्ज घेऊन कोट्यवधी रुपयांचा कर्ज घोटाळा करण्यात आल्याचे दिनांक ११ ऑगस्ट, २०१८ रोजी वा त्यासुमारास निर्दशनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, प्रकाश डंगारे यांनी सदर बँकेकडे कर्जाची मागणी केलेली नसतानाही त्यांनी माहे ऑगस्ट, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान कॉर्पोरेशन बँकेकडून ४५ लाख रूपयांचे कर्ज सन २०१७ मध्ये घेण्यात आले असून व्याजासह ५२ लाख १६ हजार २८ रूपये भरण्यात यावे अशी नोटीस बँकेकडून देण्यात आली असून सदर नोटीस मिळाल्यानंतर हा घोटाळा झाल्याचे निदर्शनास आले असून सदर गैरव्यवहार हा बँकेच्या अधिकाऱ्यांच्या संगनमताने झाला आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, यासंदर्भात शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व तद्‌नूसार संबंधितांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१५-११-२०१८) :** (१), (२) व (३) सदर प्रकरणी ११ फिर्यादींच्या तक्रारीवरून प्रथमदर्शनी रुपये ५.२४ कोटी रकमेची फसवणूक झाल्याची दिसून आल्याने ७ आरोपींविरूध्द दिनांक २२/१०/२०१८ रोजी पोलीस स्टेशन, जलालखेडा येथे अप.नं. ३०४/१८ भादंवि कलम ४२०, ४०९, ४६७, ४६८, ४७१, ३४ अन्वये गुन्हा नोंद करण्यात आला असून सदर गुन्हयाचा तपास आर्थिक गुन्हे शाखा, नागपूर ग्रामीण मार्फत सुरु आहे.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## थेरोंडा-आगल्याचीवाडी (ता.अलिबाग, जि.रायगड) येथील खाडीवर मच्छिमारांसाठी पुल बांधून देण्याबाबत

**(३४) ४५०१७ (३१-१०-२०१८). श्री.जयंत पाटील :** सन्माननीय **मत्स्यविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) अलिबाग (जि.रायगड) तालुक्यातील रेवदंडा ग्रामपंचायत हद्दीतील थेरोंडा-आगल्याचीवाडी येथील मच्छिमार बांधवांना खाडीवर पुल नसल्यामुळे मच्छिमारांना आपली ओली व सुकी मच्छिची वाहतूक छोट्या होडीच्या सहाय्याने करुन मच्छी सुकविण्यासाठी खाडीच्या दुसऱ्या भागाकडे जावे लागत आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, खाडीच्या पाण्याच्या प्रवाहामुळे मच्छीची वाहतूक करताना होडी बुडण्याचे प्रकारही घडत असल्यामुळे वाहतूक करीत असलेली मच्छी खाडीत पडून मच्छिमारांचे नुकसान होत असल्याने मच्छिमार बांधवांनी थेरोंडा-आगल्याचीवाडी येथे मच्छी सुकविण्यासाठी पुल बांधून देण्याची मागणी शासनाकडे केली आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.महादेव जानकर (१६-११-२०१८) :** (१) होय.
(२) वाहतूक करताना होडी बुडाल्याची एकही तक्रार मत्स्यव्यवसाय विभागास प्राप्त झालेली नाही. वाहतुकीसाठी मासळीची चढ उतार करताना थोड्याफार प्रमाणात मासळीचे नुकसान होते. मा.श्री.जयंत पाटील यांनी पूल बांधून देण्याची मागणी केली आहे.
(३) सदर खाडीवर पूल बांधण्याचे काम जिल्हा वार्षिक योजनेंतर्गत समाविष्ट करण्यात आले असून सदर पूल बांधण्यासाठी जिल्हा वार्षिक योजनेंतर्गत रुपये १.२५ कोटी निधी उपलब्ध करुन दिला आहे. सदर पूलाचे बांधकाम सार्वजनिक बांधकाम विभाग यांच्यामार्फत करण्यात येईल.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## रायगड जिल्ह्यामध्ये अधिकृत रेती उत्खनन व्यवसाय सुरु करण्याबाबत

**(३५) ४५०४३ (३१-१०-२०१८). श्री.जयंत पाटील :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यात अधिकृत रेती व्यवसायाला रितसर परवानगी देवून अधिकृत रेती व्यवसाय सुरु करण्याचे शासनाने निर्देश दिले असून अधिकृत रेती उत्खनन व्यवसायाला शासनाकडून परवानगी न मिळाल्यामुळे अवैधरित्या रेती उत्खनन व्यवसाय सुरु आहेत, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, रायगड जिल्ह्यामध्ये रेती व्यवसाय बंद असल्याने ग्रामीण भागातील मजूरांच्या कुटुंबियांवर उपासमारीची वेळ आली आहे तसेच रेती बंद असल्याने जादा दराने रेती खरेदी करावी लागत आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन रायगड जिल्ह्यामध्ये रेती व्यवसायास परवानगी देवून अधिकृत रेती उत्खनन व्यवसाय सुरु करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (१९-११-२०१८) :** (१) व (२) अशी बाब निदर्शनास आलेली नाही.
(३) रायगड जिल्हयामध्ये शासनाच्या प्रचलित धोरणानुसार वाळू/रेती निर्गतीबाबत कार्यवाही सुरु आहे.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## रायगड जिल्हयासह कोकणातील मच्छिमारांसाठी पावसाळी हंगामात विशेष आर्थिक मदत देण्याबाबत

**(३६) ४५०४४ (३१-१०-२०१८). श्री.जयंत पाटील :** सन्माननीय **मत्स्यविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) रायगड जिल्हयासह कोकणात पावसाच्या हंगामात दिनांक १ जून ते १ ऑगस्ट पर्यंत मासेमारी करण्यास शासनाने कायदेशीर बंदी घातल्यामुळे सदर कालावधीत मासेमारी व्यवसाय बंद असतो, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, या दोन महिन्याच्या काळात मासेमारी बंद असल्याकारणाने स्थानिक मच्छिमारांच्या कुटुंबाचा उदरनिर्वाहाचा प्रश्न निर्माण झाला आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने सदरहू दोन महिन्याच्या कालावधीत मासेमारी व्यवसाय करणाऱ्या मच्छिमारांना विशेष आर्थिक मदत देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.महादेव जानकर (१५-११-२०१८) :** (१) १ जून ते ३१ जुलै पर्यंत यांत्रिक मासेमारी नौकांना मासेमारी बंदी घातली जाते. बिगर यांत्रिक नौकांच्या सहाय्याने मासेमारी करण्यास बंदी नाही.
(२) नाही.
(३) मासेमारी बंदी कालावधीत मच्छिमारांना आर्थिक मदत देण्याबाबत केंद्र व राज्य शासनामार्फत निलक्रांती योजनेंतर्गत “मच्छिमारांकरीता राष्ट्रीय कल्याणकारी बचतीसह मदतीची योजना सन २०१६-१७ पासून कार्यान्वित

करण्यात आली असून या योजनेंतर्गत मच्छिमारांना आर्थिक सहाय्य उपलब्ध करुन दिले जाते.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## गोवंडी (मुंबई) येथील संजयनगर येथे महापालिकेच्या उर्दू माध्यमाच्या शाळेतील विद्यार्थ्यांना विषबाधा झाल्याबाबत

**(३७) ४५०५४ (०२-११-२०१८). श्री.जयंत पाटील :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) गोवंडी (मुंबई) येथील संजयनगर येथे महापालिकेच्या उर्दू माध्यमाच्या शाळेतील २२० विद्यार्थ्यांना दिनांक १० ऑगस्ट, २०१८ रोजी वा त्यासुमारास विषबाधा झाली असून त्यापैकी चांदनी शेख या १२ वर्षीय विद्यार्थीनीचा मृत्यू झाला आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, शाळेत विद्यार्थ्यांना दिलेल्या फॉलिक ॲसिडच्या गोळ्यांमधून विषबाधा झाल्याचा आरोप विद्यार्थ्यांच्या पालकांकडून करण्यात आला आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, राज्यात शाळेत विद्यार्थ्यांनी खिचडी खाल्यामुळे विषबाधा होण्याच्या घटनेत वाढ झाल्याचेही निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, सदर प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुसार दोषींवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे तसेच विद्यार्थ्यांना पौष्टिक जेवण पुरविण्याबाबत कोणती उपाययोजना केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२२-११-२०१८) :** (१) गोवंडी (मुंबई) संजयनगर येथील बृहन्मुंबई महानगरपालिकेच्या उर्दु माध्यमाच्या शाळेतील २२० विद्यार्थ्यांना विषबाधा झाली हे खरे नाही.

तसेच, कु. चांदनी शेख या १२ वर्षीय विद्यार्थीनीचा मृत्यू झाला ही वस्तुस्थिती आहे. तथापि, सदर मृत्यू हा विषबाधेमुळे झाला नसल्याचे बृहन्मुंबई महानगरपालिकेने कळविले आहे.

(२) सदर शाळेतील विद्यार्थ्यांना देण्यात आलेल्या फॉलिक ॲसिडच्या गोळयांमधून विषबाधा झाल्याचा आरोप विद्यार्थ्यांच्या पालकांकडून करण्यात आला आहे.

तथापि, हे खरे नसल्याचे बृहन्मुंबई महानगरपालिकेमार्फत कळविण्यात आले आहे.

(३) व (४) राज्यामध्ये शालेय पोषण आहारामधून विषबाधेच्या घटना घडल्या असून, विषबाधा प्रकरणांमध्ये दोषी आढळलेल्या बचतगटांवर काम काढून घेणे, दंडात्मक कारवाई करणे, संबंधित पोलीस स्टेशनमध्ये गुन्हा दाखल करणे तसेच, संबंधित शाळेच्या मुख्याध्यापकास निलंबित करणे, वेतनवाढ रोखणे इत्यादी प्रकारच्या कारवाया करण्यात आल्याचे शालेय पोषण आहार योजना, स्वतंत्र कक्ष, महाराष्ट्र राज्य, पुणे-१ यांचेमार्फत कळविण्यात आले आहे.

शालेय पोषण आहार ही केंद्र पुरस्कृत योजना असून, केंद्र शासनाच्या विहीत निकषानुसार दुपारचे शिजविलेले अन्न देण्यात येते. तसेच, आठवड्यातून १ दिवस पूरक आहार म्हणून फळे, सोयाबिस्कीट, दूध, चिक्की, राजगिरा लाडू, गुळ, शेंगदाणे, बेदाणे, चुरमुरे, इ. उपलब्ध करुन देण्यात येते असे अभिप्राय शालेय शिक्षण विभागामार्फत उपलब्ध करुन देण्यात आले आहेत.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मुंबई येथील नायगाव मुख्यालयातील पोलीस शिपायांना गत दीड वर्षभरात प्रवास भत्ता अदा करण्याबाबत

**(३८) ४५०५७ (३०-१०-२०१८). श्री.जयंत पाटील :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबई येथील नायगाव मुख्यालयातील हत्यारी विभागातील पोलीस शिपाई प्रतिनियुक्तीवर ८ किलोमीटरच्या बाहेर बंदोबस्त अथवा इतर कार्यालयीन कामासाठी गेल्यास त्यांना २ हजार २० रूपये इतका प्रवास भत्ता दिला जातो, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, मुंबई येथील नायगाव मुख्यालयातील हत्यारी विभागातील सुमारे पाच हजार पोलीस शिपायांना माहे फेब्रुवारी, २०१७ रोजी पासून प्रवास भत्ता देण्यात आलेला नसून अनेक पोलीस शिपायांनी वरिष्ठ अधिकाऱ्यांकडे तक्रार करूनही त्याची दखल अद्‌याप घेण्यात आलेली नाही, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीनुसार सदर पोलीस शिपायांना प्रवास भत्ता देण्याबाबत कोणती उपाययोजना वा कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१९-११-२०१८) :** (१) पोलीस अंमलदार यांना दैनिक भत्ता प्रदानाचा सर्वसाधारण दर रुपये १६०/- असून वित्त विभाग, शासन निर्णय दिनांक १०/०१/२०१७ अन्वये अनज्ञेय दैनिक भत्त्याच्या ५० % प्रमाणे प्रतिदिन रुपये ८०/- नुसार २५ दिवसांचे रुपये २०००/- देय आहेत.

(२) व (३) सशस्त्र पोलीस नायगांव, मुंबई (ल विभाग-१) या कार्यालयाच्या आस्थापनेवरील एकूण ९०० पोलीस कर्मचारी प्रतिनियुक्तीवर अन्य कार्यालयात कर्तव्य बजावत आहेत. प्रतिनियुक्तीवर नेमणूक केलेले पोलीस अंमलदार यांना माहे फेब्रुवारी, २०१७ नसून मार्च, २०१८ पासून प्रवासभत्ता देण्यात आलेला नाही.

प्रतिनियुक्तीवर असलेले अंमलदार हे मुख्यालयात हजेरी देत नसल्यामुळे त्यांना प्रवास भत्ता मिळत नसल्याबाबत व अश्याप्रकारे मुख्यालयात दररोज दोन वेळेस हजेरी देवून प्रतिनियुक्तीवरील कर्तव्याच्या ठिकाणी ये-जा करणे मुंबईतील वाहतूक समस्येच्या अनुषंगाने अव्यवहार्य व शक्य नसल्याच्या तक्रारी/गाऱ्हाणी वरिष्ठांसमोर मांडल्या होत्या.

त्यानुषंगाने बृहन्मुंबईतील वाहतुकीची समस्येच्या कारणास्तव प्रतिनियुक्तीवरील पोलीस अंमलदारांना कर्तव्याच्या ठिकाणी विहित वेळेत

पोहचणे अडचणीचे ठरते. त्यामध्ये वेळेचा अपव्यय होतो. यास्तव वरिष्ठ अधिकारी स्तरावर याबाबत सहानुभूतीपूर्वक निर्णय घेण्यात येऊन, संबंधित प्रतिनियुक्ती वरील पोलीस अधिकारी/अंमलदार यांना माहे ऑगस्ट, २०१८ पासून प्रतिनियुक्तीवरील हजेरी देण्यातून सूट देण्यात आली आहे. त्याकरीता प्रतिनियुक्तीवरील कार्यालयाचे प्रमाणपत्र जोडून प्रवासभत्त्याची मागणी करणे आवश्यक आहे.

त्यानुसार प्रतिनियुक्तीवरील अंमलदारांकडून प्रवासभत्त्याची मागणी ऑगस्ट, २०१८ पासून प्राप्त झाली असून, त्यानुसार देयके तयार करुन मंजूरीसाठी कोषागारात सादर करण्यात येत आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील गिरणी कामगाराच्या प्रलंबित घरांच्या प्रश्नाबाबत

**(३९) ४५०७२ (३०-१०-२०१८). श्री.जयंत पाटील, श्री.बाळाराम पाटील, श्री.दत्तात्रय सावंत :** सन्माननीय **गृहनिर्माण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील गिरणी कामगारांनी घरासाठी अर्ज भरलेल्या १ लाख ७५ हजार कामगारांच्या घरांचा प्रश्न मार्गी लावण्यास शासनाकडून होत असलेल्या दिरंगाईमुळे दिनांक २८ ऑगस्ट, २०१८ रोजी वा त्यासुमारास मुंबईतील आझाद मैदानावर गिरणी कामगारांच्या संघटनांनी तीव्र आंदोलन करून आपल्या मागण्याचे एक निवेदन गृहनिर्माण विभागाचे अप्पर सचिव श्री.संजीवकुमार यांना सादर केले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुसार सदरहू मागण्यांबाबत आजमितीस कोणकोणते निर्णय घेतले असून निवेदनात सादर केलेल्या मागण्या कोणत्या आहेत,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.प्रकाश महेता (१६-११-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.

गिरणी कामगार कृती संघटनेच्या पदाधिकाऱ्यांनी त्यांचे दिनांक २७/०८/२०१८ रोजीचे निवेदन अपर मुख्य सचिव, गृहनिर्माण यांना दिनांक २८/०८/२०१८ रोजी दिलेले आहे.

(२) गिरणी कामगार कृती संघटनेच्या सदर दिनांक २७/०८/२०१८ रोजीच्या निवेदनातील विविध मुद्द्यांच्या अनुषंगाने संबंधित विभागांसोबत मा.मुख्य सचिव महोदयांच्या अध्यक्षतेखाली दिनांक ०६/१०/२०१८ रोजी बैठक झालेली असून सदर बैठकीचे इतिवृत्त दिनांक १९/१०/२०१८ रोजी निर्गमित करण्यात आलेले आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## सावित्री खाडी (ता.महाड, जि.रायगड) पट्ट्यात अवैध रेती उत्खनन रोखण्याबाबत

**(४०) ४५०८३ (३१-१०-२०१८). श्री.जयंत पाटील, श्री.प्रसाद लाड :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) महाड (जि.रायगड) तालुक्यातील सावित्री खाडी पट्ट्यात पर्यावरणाच्या नियमांचे उल्लघंन करुन रेती उत्खनन सुरु असल्यामुळे तसेच नदी पात्रात जेटीची अनधिकृत बांधकामे झाल्याने खाडीपात्राला धोका निर्माण होऊन खाडीपात्र अरुंद होऊन दुर्घटना होण्याची शक्यता निर्माण झाली असल्याचे निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, महाड तालुक्यातील सव, रावढळ, तुडील, जुई, म्हाप्रळ, कोंबळे, वराठी या गावाबरोबरच दासगाव, टोळ, सापे, दाभोळ, कोकरे ही खाडीलगत गावे असून या गावांच्या परिसरात सक्शन पंपाद्वारे वाळू उत्खनन होत असल्याने तसेच नदी पात्रात भराव करुन पक्के बांधकाम करुन जेटीची कामे केली जात असल्यामुळे व रेती साठ्यास देण्यात आलेले प्लांट हे कांदळवन क्षेत्रात असल्याने खाडी किनारे धोक्यात आल्यामुळे तेथील नागरीकांनी मागील ३ वर्षांपासून जिल्हाधिकारी, रायगड यांच्याकडे तक्रारी करूनही कोणतीही कार्यवाही झाली नाही, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, मा.उच्च न्यायालय, मुंबई ने कांदळवन क्षेत्र असलेल्या भागात तसेच कांदळवन क्षेत्रापासून ५० मीटर बफर क्षेत्रात कोणतेही बांधकाम

करण्यात येवू नये आणि तशा प्रकारची बांधकामे झाली असल्यास ती विनाविलंब निष्कासित करण्यात यावीत तसेच संबंधितांविरोधात कारवाई करण्यात यावी असे आदेश दिलेले आहेत, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने सावित्री नदी पात्रात तसेच कांदळवन क्षेत्रात झालेली सर्व बांधकामे निष्कासित करण्याच्यादृष्टीने तसेच नियमबाह्य सुरु असलेल्या रेती उत्खनन रोखण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (१९-११-२०१८) :** (१), (२), (३) व (४) महाड (जि.रायगड) तालुक्यातील सावित्री खाडी पट्ट्यात यापुर्वी पर्यावरणाच्या नियमांचे उल्लंघन करुन रेती उत्खनन सुरु असल्याचे तसेच जेट्टीची अनधिकृत बांधकामे झाले असल्याचे यापूर्वी निदर्शनास आले आहे. परंतु १ वर्षापासून आज रोजीपर्यंत सक्शन पंपाद्वारे अवैध रेती उत्खनन बंद आहे.

महाड तालुक्यातील सव, रावढळ, तुडील, जुई, वराठी, दासगाव, टोळ, सापे तर्फे गोवेले, दाभोळ, कोकरे तर्फे गोवेले या गावातील खाडी किनारी कांदळवनाची तोड झाल्याची तसेच सक्शन पंपाद्वारे रेती उत्खनन होत असल्याबाबत काही तक्रारी शासनाकडे व जिल्हाधिकारी, रायगड यांच्याकडे प्राप्त झाल्या होत्या. या तक्रारींच्या अनुषंगाने तहसिलदार, महाड यांनी चौकशी केली असता या गावातील खाडी किनारी कांदळवनाची तोड झाल्याचे निदर्शनास आलेले नाही. तथापि, सदर गावातील खाडी किनारी अनधिकृतरित्या वाळू साठवणूकीसाठी काही ठिकाणी जागा तयार केल्याचे तसेच तात्पुरत्या जेटी उभारल्याचे निदर्शनास आले आहे. सदरची अनधिकृत बांधकामे निष्कासित करण्याची कार्यवाही तहसिलदार, महाड यांचे स्तरावर सुरु असून खाडीपात्रातील अनधिकृत जेटीची बांधकामे निष्कासित करण्याबाबत महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड यांना कळविण्यात आले आहे.

कांदळवन असलेल्या क्षेत्रामध्ये तसेच अशा क्षेत्रापासून ५० मीटर क्षेत्रामध्ये बांधकाम करण्यावर मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी निर्बंध घातले आहेत.

सन २०१७-१८ या वर्षासाठी रायगड व रत्नागिरी जिल्ह्याच्या हद्दीतील सावित्री नदी-बाणकोट खाडी भागातील शिपोळे ते आडी मधील राखीव ३ संयुक्त रेतीगटातून ड्रेजरद्वारे वाळू/रेती उत्खननासाठी लिलावाद्वारे देण्यात आले असून त्यापासून शासनास रुपये ८,८१,१९,७९७/- इतका महसूल प्राप्त झाला आहे.

महाड तालुक्यात सन २०१४-२०१८ या कालावधीत वाळूचे अवैध उत्खनन व वाहतुकीच्या २२८ प्रकरणी दंडात्मक कार्यवाही करुन रुपये १,२२,५१,३३६/- इतकी रक्कम वसूल करण्यात आली असून १६ गुन्हे दाखल करण्यात आले आहे. तसेच २१ सक्शन पंपावर कारवाई करण्यात आली आहे.
(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## विरार येथील उपप्रादेशिक परिवहन कार्यालयास पासिंग ट्रॅक व इतर सोयीसुविधा उपलब्ध करुन देण्याबाबत

**(४१) ४५१४२ (३१-१०-२०१८). श्री.रविंद्र फाटक :** सन्माननीय **परिवहन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) विरार येथील उपप्रादेशिक परिवहन कार्यालयातील पासिंग ट्रक मागील १८ महिन्यांपासून बंद असल्यामुळे वाहतुकदारांचे नुकसान होत आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, विविध राजकीय संघटनांनी माहे जून ते सप्टेंबर, २०१८ या कालावधीत राज्य परिवहन महामंडळाच्या कामकाजामधील उणिवाबाबत व प्राथमिक सोयीसुविधांच्या अभावाबाबत विरार प्रादेशिक परिवहन कार्यालयावर मोर्चे काढण्यात आले आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने विरार येथील उपप्रादेशिक परिवहन कार्यालयातील बंद असलेला पासिंग ट्रॅक सुरु करुन इतर सोयीसुविधा उपलब्ध करून देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.दिवाकर रावते (१७-११-२०१८) :** (१) उपप्रादेशिक परिवहन कार्यालय, वसई येथील वाहन योग्यता प्रमाणपत्र तपासणी कामकाज दिनांक १६/०५/२०१८ ते दिनांक १०/०८/२०१८ या कालावधीकरीता बंद होते. तथापि, वाहन योग्यता प्रमाणपत्र तपासणीसाठीची पर्यायी व्यवस्था करण्यात आली होती.

(२) महाराष्ट्र नवनिर्माण वाहतूक सेना या संघटनेने दिनांक ०६/०८/२०१८ रोजी आंदोलन केले आहे.

(३) उपप्रादेशिक परिवहन कार्यालय, वसई या कार्यालयाच्या ब्रेक टेस्ट ट्रॅकसाठी जिल्हाधिकारी, पालघर यांनी दिनांक १५/१२/२०१६ च्या आदेशान्वये मौजे गोखिवरे ता.जि.पालघर येथे जागा उपलब्ध करुन दिली आहे. त्यानुषंगाने सदर ठिकाणी ब्रेक टेस्ट ट्रॅक उभारण्यास शासन ज्ञापन दिनांक ०७/०१/२०१७ अन्वये प्रशासकीय व वित्तिय मान्यता दिली आहे. तथापि, सदर जागेसंदर्भात स्थानिक न्यायालयामध्ये दावा दाखल करण्यात आला असून प्रकरण न्यायप्रविष्ट असल्याने सदर ठिकाणी ब्रेक टेस्ट ट्रॅकचे बांधकाम करण्यात आलेले नाही. मे.एच.डी.आय.एल यांचा स्वतःचा खाजगी रस्ता ब्रेक टेस्ट चाचणीसाठी वापरण्यास हरकत नसल्याचे त्यांनी शपथपत्राद्वारे कळविले असल्याने सदर ठिकाणी दिनांक ११/०८/२०१८ पासून उपप्रादेशिक परिवहन कार्यालय, वसई यांच्या कार्यक्षेत्रातील सर्व परिवहन वाहनांच्या ब्रेक टेस्ट चाचणी घेण्यात येत आहेत.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## पुणे शहरात स्मार्ट सिटी योजनेंतर्गतच्या रस्त्यांची कामे विकासकांच्या सांगण्यावरुन करण्यात येत असल्याबाबत

**(४२) ४५१९० (०२-११-२०१८). श्री.अनिल भोसले, श्री.विक्रम काळे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) पुणे शहरात स्मार्ट सिटी योजनेंतर्गत २०० कोटी रुपये खर्च करुन बांधण्यात येत असलेले रस्ते विकासकांच्या सांगण्यानुसार बांधण्यात येत असून एकत्रितरित्या संपूर्ण रस्त्यांची वर्कऑर्डर न देता १०-१५ कोटीच्या वेगवेगळया वर्कऑर्डर देऊन विकासकांचे हित साधले जात असल्याचे निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, गत ३-४ वर्षाच्या कालावधीत २७ पैकी फक्त ३ प्रकल्प पूर्ण झाले असून, संपूर्ण रस्ता बांधकामाचे अधिकार मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी स्वत:कडे घेतले असल्याची बाब माहे सप्टेंबर, २०१८ च्या दुसऱ्या आठवड्यात निदर्शनास आली आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व तद्नुसार स्मार्ट सिटी योजनेच्या २७ प्रकल्पांची कामे पूर्ण झाली नसल्याने जबाबदार मुख्य कार्यकारी अधिकारी तसेच इतर अधिकारी यांच्यावर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१९-११-२०१८) :** (१) स्मार्ट सिटी प्रकल्पांतर्गत बाणेर व बालेवाडी येथे २७ कि.मी. रस्त्याची विविध कामे सुरु आहेत. सदर कामांच्या दोन निविदा पुणे स्मार्ट सिटी डेव्हलपमेंट कॉर्पोरेशन लिमिटेड यांच्यामार्फत प्रसिध्द करण्यात आल्या आहेत.

त्यानुसार निविदा प्रक्रियेअंती सदर कामासाठी निविदाकारांच्या प्राप्त निविदांमधून लघुत्तम निविदा स्विकृत करण्यात आल्या होत्या.

तथापि, रस्त्याच्या कामांमुळे रहदारीला होणारा अडथळा, रस्त्याच्या कामासाठी जमिनीचे करावे लागणारे संपादन इत्यादी घटकांचा विचार करता सदर कामांचे कार्यादेश टप्प्याटप्प्याने देण्यात आलेले आहेत.
(२), (३) व (४) स्मार्ट सिटी अभियानाच्या मार्गदर्शक तत्वांनुसार पुणे स्मार्ट सिटी डेव्हलपमेंट कॉर्पोरेशन लिमिटेडची स्थापना करण्यात आली आहे.

सदर विशेष उद्देश वहनाच्या मेमोरॅन्डम ऑफ आर्टिकल ऑफ असोसिएशन नुसार संचालक मंडळाची नियुक्ती करण्यात आलेली असून कार्यकारी समिती आणि मुख्य कार्यकारी अधिकारी हे उपरोक्त संचालक मंडळाच्या नियंत्रणाखाली काम करतात.

स्मार्ट सिटी अभियानांतर्गत विशेष उद्देश वहनांना सर्व प्रशासकीय तसेच वित्तिय अधिकार देण्यात आले असून प्रकल्प कालमर्यादेत राबविण्याची पूर्ण जबाबदारी विशेष उद्देश वहनाची आहे.

पुणे स्मार्ट सिटी डेव्हलपमेंट कॉर्पोरेशनच्या ६२ प्रकल्पांपैकी :

- ११ प्रकल्प पूर्ण झाले आहेत,
- २४ प्रकल्पांची कामे प्रगतीपथावर आहेत,
- १९ प्रकल्प निविदाधीन आहेत,
- ८ प्रकल्पांचे सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करण्यात येत आहेत.

---

## राज्यातील आश्रमशाळांना कला व क्रीडा शिक्षक हे पूर्णवेळ पद नसल्याबाबत

**(४३) ४५२०१ (२६-१०-२०१८). डॉ.सुधीर तांबे, श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.आनंदराव पाटील, ॲड.रामहरी रुपनवर, ॲड.हुस्नबानू खलिफे, श्री.विक्रम काळे, श्री.दत्तात्रय सावंत, श्री.श्रीकांत देशपांडे, श्री.बाळाराम पाटील :** सन्माननीय **आदिवासी विकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील आदिवासी शाळांतील विद्यार्थ्यांच्या शैक्षणिक प्रगती बरोबरच त्यांच्या क्रीडा गुणांना वाव मिळावा व भविष्यात त्यांच्याकडून दर्जेदार खेळाडू घडावेत याकरीता शासनाने प्रत्येक आदिवासी आश्रमशाळेत क्रीडा शिक्षक नेमण्याचे धोरण माहे मार्च, २०१८ पासून आखले आहे व त्यानुसार रायगड जिल्ह्यात चालू शैक्षणिक वर्षाच्या सुरूवातीस ही पदभरती करण्यात येणार होती मात्र रायगड जिल्ह्यातील एकाही आदिवासी आश्रम शाळेत क्रीडा शिक्षकाची नेमणूक करण्यात आलेली नाही तसेच राज्यातील आश्रमशाळांना कला व क्रीडा शिक्षक हे पूर्णवेळ पद नाही, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, या आदिवासी शाळांमध्ये क्रीडा शिक्षक पद रिक्त असल्यामुळे येथील विद्यार्थ्यांना खेळामधील बदललेले तंत्रज्ञान, प्रशिक्षणाच्या पध्दती, खेळामधील कौशल्य, नवीन खेळांची ओळख, खेळांची शास्त्रोक्त माहिती आदींपासून वंचित रहावे लागत असून कला व क्रीडा शिक्षकांचे पद पूर्णवेळ नसल्यामुळे विद्यार्थ्यांच्या कलागुणांना वाव मिळत नाही, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, गेली कित्येक वर्षे क्रीडा शिक्षकाची भरती राज्यासह रायगड जिल्ह्यात झालेली नसल्यामुळे ती लवकरात लवकर व्हावी अन्यथा रायगड जिल्ह्यातील शारिरीक शिक्षकाची पदवी घेणाऱ्या उमेदवाराला जिल्हाधिकारी कार्यालयासमोर आंदोलन करावे लागेल अशा प्रकारचा इशारा सुधागड तालुक्यातील पाली येथील शारिरीक शिक्षक नितीन ढमके यांनी शासनाला दिला आहे, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, कला व क्रीडा शिक्षकांचे पद निर्मितीबाबतचे धोरण आहे काय, तसेच जिल्ह्यातील आश्रमशाळांमध्ये क्रीडा शिक्षकांची आजमितीस नेमणूक न करण्याची सर्वसाधारण कारणे काय आहेत व जिल्ह्यातील १४ आश्रमशाळांमध्ये विनाविलंब क्रीडा शिक्षकांची नेमणूक करण्याच्यादृष्टीने शासनाने कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विष्णु सवरा (१४-११-२०१८)** : (१), (२), (३) व (४) शासकीय आश्रमशाळांमध्ये क्रीडा/क्रीडा मार्गदर्शकांचे नियमित पद मंजूर नाही. परंतु, आदिवासी विकास विभागाच्या अधिपत्याखालील शासकीय आश्रमशाळांमध्ये शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांच्या क्रीडा गुणांना वाव मिळण्यासाठी त्यांना खेळांचे शास्त्रोक्त प्रशिक्षण देण्याची आवश्यकता लक्षात घेऊन प्रत्येक शासकीय आश्रमशाळेत कंत्राटी पध्दतीने एक क्रीडा शिक्षक/क्रीडा मार्गदर्शकांची नेमणूक करण्याबाबतचा निर्णय आदिवासी विकास विभागाच्या दिनांक ०६ मार्च, २०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये घेण्यात आला आहे. त्यानूसार संबंधित जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली त्रिसदस्यीय निवड समिती गठीत करण्यात आली आहे.

उपरोक्त नमूद शासन निर्णयांच्या अनुषंगाने एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, पेण, जि.रायगड यांच्या अंतर्गत असलेल्या १४ शासकीय आश्रमशाळांमध्ये १४ (१३ पुरूष व १ महिला) कंत्राटी क्रीडा शिक्षक/क्रीडा मार्गदर्शकांची ११ महिन्यांच्या कराराने नेमणूक करण्यास्तव वृत्तपत्रात जाहिरात प्रसिध्द करून जिल्हाधिकारी, रायगड यांचे अध्यक्षतेखाली दिनांक १६/१०/२०१८ रोजी मुलाखतीची प्रक्रिया पार पाडून गुणानुक्रमानूसार पात्र १४ ठरलेल्या उमेदवारांना (१३ पुरूष व १ महिला) यांची निवड करून एकूण १४

शासकीय आश्रमशाळेच्या ठिकाणी नेमणूकीचे आदेश दिनांक २४/१०/२०१८ रोजी निर्गमित करण्यात आले असून त्यापैकी १३ क्रीडा शिक्षक रूजु झाले आहेत.

रायगड जिल्ह्यामध्ये विधानपरिषदेची स्थानिक प्राधिकारी मतदार संघ निवडणूक सन २०१८ तसेच भारतीय निवडणूक आयोगाची कोकण पदवीधर मतदार संघातील निवडणूकीची आदर्श आचार संहिता लागू असल्याने क्रीडा शिक्षकांची नियुक्ती करण्यासाठी जिल्हाधिकारी, रायगड/अलिबाग यांनी दिनांक १६/१०/२०१८ रोजीची तारीख मुलाखतीसाठी दिली होती. त्यामुळे सदर प्रकरणी विलंब झालेला नाही.

तसेच शासकीय आश्रमशाळांतील सद्य:स्थितील मंजूर पदांच्या आकृतिबंधानूसार कला शिक्षकांचे पद मंजूर नाही. तथापी क्रीडा शिक्षकांच्या धर्तीवर विद्यार्थ्यांमध्ये कलागुणांना वाव मिळण्यासाठी विशेष प्रकल्प घेण्यात येत आहे.

(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## नाशिक-एकलहरे ऊर्जा प्रकल्पांतील कर्मचाऱ्यांच्या बेरोजगारीचा प्रश्न निर्माण झाल्याबाबत

**(४४) ४५२११ (२९-१०-२०१८). डॉ.सुधीर तांबे, श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, ॲड.रामहरी रुपनवर, श्री.आनंदराव पाटील, ॲड.हुस्नबानू खलिफे, डॉ.वजाहत मिर्झा, श्री.विक्रम काळे, श्री.श्रीकांत देशपांडे, श्री.दत्तात्रय सावंत :** सन्माननीय **ऊर्जा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नाशिक-एकलहरे व भुसावळ औष्णिक वीज केंद्रातील संचाना सर्व सुविधा असतानाही शासनाने बंद करण्याचा निर्णय घेतला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, नाशिक-एकलहरे येथील प्रस्तावित ६६० मॅगावॅटचा ऊर्जा प्रकल्पही इतरत्र स्थलांतरीत करण्याचा शासनाचा मानस असल्यामुळे सदरील ऊर्जा प्रकल्पांतील कर्मचाऱ्यांच्या बेरोजगारीचा गंभीर प्रश्न निर्माण होणार आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, कर्मचारी, लोकप्रतिनिधी, ग्रामस्थ, बाहयस्त्रोत कर्मचारी यांचा ऊर्जा प्रकल्प इतरत्र स्थलांतरीत करण्यास विरोध आहे, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, यामुळे सदरील वीज केंद्र बंद न करण्याबाबत व प्रस्तावित नाशिक-एकलहरे येथील प्रकल्प इतरत्र स्थलांतरीत न करण्याबाबत शासनाने चौकशी करून कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रशेखर बावनकुळे (१४-११-२०१८) :** (१) नाशिक-एकलहरे औष्णिक विद्‌युत केंद्रातील सर्व संच सुरु असून भुसावळ औष्णिक विद्‌युत केंद्रातील संच क्र.१ व २ अनुक्रमे ४२ वर्ष व ३७ वर्ष १० महिने कार्यरत होते. त्यांचे आयुर्मान संपल्यामुळे तसेच सदर संचाच्या दुरुस्ती/देखभालीचा खर्च हा नियमित दुरुस्ती व देखभाल खर्चापेक्षा खूपच जास्त असल्याने, भुसावळ संच क्र.१ दिनांक १५/१२/२०१० पासून व संच क्र.२ दिनांक ०१/०४/२०१७ पासून कायमस्वरुपी बंद करण्यात आला आहे. भुसावळ येथील उर्वरीत संच क्र. ३, ४ व ५ सुरु आहेत.
(२) हे खरे नाही.
(३) हे खरे नाही.
(४) नाशिक-एकलहरे येथील प्रकल्प इतरत्र स्थलांतरीत करण्याचा निर्णय घेण्यात आलेला नाही.
(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## मुकबधीर, अस्थिव्यंग व अंध, दिव्यांग (अपंग) शाळांना इयत्ता ५ वी ते ८ वी या वर्गांना मान्यता देण्याबाबत

**(४५) ४५२१२ (२९-१०-२०१८). डॉ.सुधीर तांबे, श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.आनंदराव पाटील, ॲड.हुस्नबानू खलिफे, ॲड.रामहरी रुपनवर, डॉ.वजाहत मिर्झा, श्री.विक्रम काळे, श्री.श्रीकांत देशपांडे, श्री.दत्तात्रय सावंत :** सन्माननीय **सामाजिक न्याय मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) आरटीआय कायद्यानुसार राज्यातील इतर माध्यमांच्या शाळांना इ. ५ वी ते ८ वी पर्यंत मान्यता दिली जाते परंतु सामाजिक न्याय विभागामार्फत चालविण्यात येणाऱ्या मुकबधीर, अस्थिव्यंग व अंध, दिव्यांग (अपंग) शाळांना इयत्ता ते ५ वी ते ८ वी या वर्गांना मान्यता दिली जात नाही, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, इ. ५ वी ते ८ वीच्या वर्गांना मान्यता न मिळाल्यामुळे या शाळेतील विद्यार्थी हे पुढील शिक्षणापासून वंचित राहतात, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुसार मुकबधीर, अस्थिव्यंग व अंध, दिव्यांग (अपंग) शाळांना इ. ५ वी ते ८ वी पर्यंत मान्यता देण्यास विचाराधीन आहे काय,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.राजकुमार बडोले (१४-११-२०१८) :** (१) व (२) नाही.
(३) व (४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यातील आशा सेविकांच्या वेतनात वाढ करुन त्यांच्या प्रलंबित मागण्या मान्य करण्याबाबत

**(४६) ४५२३३ (०५-११-२०१८). डॉ.सुधीर तांबे, श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.आनंदराव पाटील, ॲड.हुस्नबानू खलिफे, ॲड.रामहरी रुपनवर, डॉ.वजाहत मिर्झा, श्री.विक्रम काळे, श्री.श्रीकांत देशपांडे, श्री.दत्तात्रय सावंत, श्री.हरिसिंग राठोड, आर्कि.अनंत गाडगीळ, श्री.अमरनाथ राजूरकर, श्री.सुभाष झांबड :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत राज्यातील बालकांचे आरोग्य सुधारण्यासाठी काम करणाऱ्या ६०,६९१ आशा सेविका कार्यरत असून सद्य:स्थितीत या सेविका स्वत:साठी आरोग्य सुविधा आणि किमान वेतनाचा

लाभ मिळण्यासाठी शासनाकडे पाठपुरावा करीत असल्याचे माहे ऑगस्ट, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, आशा सेविकांवर तब्बल ६५ कामांचा भार पडत असून, त्यांना कमी वेतनावरच काम करावे लागत आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, तेलंगणात रुपये ६ हजार, केरळमध्ये रुपये ७ हजार ५०० व महाराष्ट्रात फक्त रुपये ३ हजार वेतन मिळत आहे, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने इतर राज्याप्रमाणे महाराष्ट्रातील आशा सेविकांच्या वेतनात त्वरीत वाढ करुन त्यांच्या प्रलंबित मागण्या मान्य करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**डॉ. दीपक सावंत (२०-११-२०१८) :** (१) होय.
(२) नाही.
(३) आशा स्वयंसेविका ही योजना केंद्र सरकारची असून या योजनेंतर्गत आशा स्वयंसेविकांनी दिलेल्या सेवेनुसार त्यांना कामावर आधारित मोबदला केंद्र शासनाच्या निकषानुसार देण्यात येतो. त्यांना मासिक वेतन दिले जात नाही.
(४) केंद्र शासनाने प्रकल्प अंमलबजावणी आराखड्यात मंजूर केल्याप्रमाणे आशा स्वयंसेविकांना ७३ बाबींवर आधारित मोबदला अदा करण्यात येतो. त्यामुळे आशा स्वयंसेविकांनी अधिक काम केल्यास अधिक मोबदला देण्यात येतो.
(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## शासन संस्था पातळीवर प्रवेश झालेल्या विद्यार्थ्यांना छत्रपती शाहु महाराज सन्मान योजना इ.बी.सी. सवलत देण्याबाबत

**(४७) ४५२४३ (३१-१०-२०१८). डॉ.सुधीर तांबे, श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, ॲड.रामहरी रुपनवर, ॲड.हुस्नबानू खलिफे, श्री.आनंदराव पाटील, डॉ.वजाहत मिर्झा, श्री.विक्रम काळे, श्री.दत्तात्रय सावंत, श्री.श्रीकांत देशपांडे :** सन्माननीय **उच्च व तंत्र शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील अभियांत्रिकी व इतर टेक्निकल अभ्यासक्रमाच्या प्रवेश प्रक्रियेमध्ये सी.ई.टी. परिक्षेच्या गुणांवर प्रवेश घेतला तर खुल्या वर्गासाठी छत्रपती शाहु महाराज सन्मान योजना लागू होत नाही, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, राज्यात एकीकडे अभियांत्रिकी महाविद्यालयांमध्ये ५०% जागा रिक्त राहतात आणि इ.बी.सी. न मिळाल्यामुळे याचा परिणाम प्रवेश प्रक्रियेवर होतो, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन शासन संस्था पातळीवर प्रवेश झालेल्या विद्यार्थ्यांना छत्रपती शाहु महाराज सन्मान योजना इ.बी.सी. सवलत देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१७-११-२०१८) :** (१) नाही.

राजर्षी छत्रपती शाहु महाराज शिक्षण शुल्क शिष्यवृत्ती योजना अभियांत्रिकी व इतर व्यावसायिक अभ्यासक्रमांना राज्य सामाईक परीक्षेच्या गुणांच्या आधारे केंद्रीभूत प्रवेश प्रक्रियेव्दारे प्रवेश घेतलेल्या विद्यार्थ्यांना लागू होते.
(२) प्रश्न उद्‌भवत नाही.
(३) शासनाच्या प्रचलित धोरणानुसार केवळ केंद्रीभूत प्रवेश प्रक्रियेव्दारे प्रवेश घेतलेल्या व्यावसायिक अभ्यासक्रमांना राजर्षी छत्रपती शाहु महाराज शिक्षण शुल्क शिष्यवृत्ती योजना लागू आहे, संस्था स्तरावर प्रवेश घेतलेल्या विद्यार्थ्यांना ही योजना लागू नाही.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## पुणे शहरातील बी.आर.टी. मार्गाची दुरवस्था रोखण्याबाबत

**(४८) ४५२७६ (०२-११-२०१८). श्री.अनिल भोसले, श्री.विक्रम काळे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) पुणे शहरात बी.आर.टी. मार्गाची होणारी दुरवस्था रोखण्याकरीता पुणे महानगरपालिकेचे तत्कालीन आयुक्त यांनी बी.आर.टी. सुधारणा समितीची स्थापना केली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, गत सहा महिन्यात सदर समितीची कोणतीही बैठक घेण्यात आली नसून बी.आर.टी. मार्गाची दुरवस्था रोखण्याकरीता कोणतेही प्रयत्न करण्यात आले नसल्याने समिती सदस्य राजीनामे देत असून बी.आर.टी. सुधारणा समिती बरखास्त होण्याच्या मार्गावर असल्याची बाब माहे सप्टेंबर, २०१८ च्या दुसऱ्या आठवड्यात निदर्शनास आली आहे, हे खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व तद्नुसार बी.आर.टी. सुधारणा समितीची नियमित बैठक न घेणाऱ्या जबाबदार पदाधिकाऱ्यांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०९-११-२०१८)** : (१) बीआरटी मार्ग देखभाल व दुरूस्तीकरीता दिनांक २०/०३/२०१८ रोजीच्या आदेशान्वये आयुक्त, पुणे महानगरपालिका यांनी समिती स्थापन केली आहे, हे खरे आहे.
(२) व (३) याबाबत दिनांक १४/०९/२०१८ रोजी दै.सामना या वृत्तपत्रामध्ये बातमी आली होती, हे खरे आहे.

तथापि, समितीची दिनांक ०३/०३/२०१८, दिनांक २२/०३/२०१८ दिनांक २५/०४/२०१८, दिनांक ०७/०६/२०१८ व दिनांक २३/०७/२०१८ या दिवशी समितीच्या सदस्यांची बैठक घेण्यात आलेली आहे.

समितीतील श्रीमती कनीज सुखराणी व श्री.जुगल राठी यांनी बीआरटी मार्गातील मेट्रो मार्गाचे नियोजन बदल, उड्डाणपूल, बीआरटी मार्गातील अतिक्रमणे, पार्किंग, पादचारी मार्ग यातील त्रुटी तसेच रस्ते दुरूस्तीचे धोरण ठरविणेबाबत आग्रही होते. तथापि, सदर कामे त्वरीत न झाल्याने त्यांनी कृती समितीचा राजीनामा दिला आहे, ही वस्तुस्थिती आहे.

तथापि, समितीचे कामकाज चालू आहे.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## पुणे शहरात पर्यावरणपूरक ई-बस सुरु करण्याबाबत मा.मुख्यमंत्र्यांनी महामंडळाला निर्देश दिल्याबाबत

**(४९) ४५२७९ (०२-११-२०१८). श्री.अनिल भोसले, श्री.विक्रम काळे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) पुणे शहरात पर्यावरणपूरक ई-बस सुरु करण्याकरीता मुंबईत मा.मुख्यमंत्र्यांनी महामंडळाला निर्देश दिले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, शहरातील बसेसकरीता डिझेलला पर्याय म्हणून सी.एन.जी. बस सुरु केले असता डिझेल पेक्षाही जास्त रक्कम सी.एन.जी बसकरीता खर्च होत असल्याचेही निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, ई-बस सेवेबाबत कुठेही तरतूद नसताना तसेच कोणाचेही मत विचारात न घेता शासनाने निर्णय घेतल्याची बाब माहे सप्टेंबर, २०१८ च्या शेवटच्या आठवड्यात निदर्शनास आली आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले आहे तसेच सद्या असलेल्या बसेसच्या दुरुस्तीकरीता शासनाकडे रक्कम उपलब्ध नसताना ई-बसेस घेऊन काय साध्य करणार आहे तसेच शासनाकडे ई-बसेसकरीता कोणतीही तरतूद नसताना असा निर्णय घेण्याचे कारण काय आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१९-११-२०१८) :** (१) हे खरे आहे.

(२), (३) व (४) पुणे शहरातील वाढती लोकसंख्या, वाढती वाहने, यामुळे होणारे प्रदूषण व त्याचे वाढणारे प्रमाण यामुळे नागरिकांच्या आरोग्यास होणारा धोका टाळण्यासाठी तसेच शहरामधील वाढते प्रदूषण कमी होण्यासाठी जरी डिझेल बसेस पेक्षा सी.एन.जी. वरील खर्च जास्त होत असला तरी प्रदूषण नियंत्रण होण्याच्या दृष्टीकोनातून सी.एन.जी. बसेस खरेदी करण्यात आल्या आहेत व येत आहेत, ही वस्तुस्थिती आहे.

याबाबत दै. पुढारी या वृत्तपत्रामध्ये दिनांक ६/९/२०१८ रोजी बातमी आली होती हे खरे आहे.

महामंडळास जवळपास तीन हजार बसेसची आवश्यकता आहे. सध्याची बस संख्या कमी असल्याने केंद्र सरकारच्या धोरणानुसार तसेच पुणे व पिंपरी चिंचवड महानगरपालिका व स्मार्ट सिटीच्या माध्यमातून संचालक मंडळाच्या मान्यतेनुसार ५०० सी.एन.जी. व ५०० ई-बसेस खरेदीची प्रक्रिया सुरु आहे.

याकरीता संचालक मंडळाच्या दिनांक २३/०५/२०१८ व दिनांक ३०/०७/२०१८ च्या ठरावान्वये मान्यता घेण्यात आलेली आहे.

याकरीता स्मार्ट सिटी मार्फत निधी उपलब्ध होणार असून त्याशिवाय पुणे व पिंपरी चिंचवड महानगरपालिकांकडून त्यांच्या दायित्वानुसार रक्कम प्राप्त होणार आहे.

सदरच्या बस खरेदीबाबत सेंट्रल इन्स्टीट्यूट ऑफ रोड ट्रान्सपोर्ट (सी.आय.आर.टी.) यांचे मार्गदर्शन मागविण्यात आले असून सी.आय.आर.टी. मार्फत पहिल्या टप्प्यामध्ये १५० ई-बसेस ची निविदा प्रक्रिया अंतिम करण्यात आलेली आहे.

(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## पुणे महानगरपालिकेने खोट्या नोंदी करुन लाखो रुपयांचे बनावट देयके अदा केल्याबाबत

**(५०) ४५२८० (०२-११-२०१८). श्री.अनिल भोसले, श्री.विक्रम काळे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) पुणे महानगरपालिकेने सन २०१७ मध्ये शतकोत्तर सार्वजनिक गणेशोत्सवा निमित्त शाडू मातीचे गणपती बनविण्याच्या गिनीज बुक ऑफ रेकॉर्डमध्ये नोंद करण्याकरीता ३००० विद्यार्थ्यांनी भाग घेतल्याची खोटी नोंद करुन महानगरपालिकेने लाखो रुपयांचे खोटी देयके अदा केली असून गिनीज बुक ऑफ रेकॉर्डमध्ये सुध्दा नोंद झाली नसल्याचे माहे सप्टेंबर २०१८ च्या शेवटच्या आठवड्यात निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत दोषी आढळलेल्या महानगरपालिका अधिकाऱ्यांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२२-११-२०१८) :** (१) व (२) या प्रकरणी संभाजी महाराज संघर्ष समितीने दिनांक १५/०६/२०१८ रोजी माहितीचा अधिकार अधिनियम, २००५ अन्वये पुणे महानगरपालिकेकडून माहिती मागविली होती.

पुणे महानगरपालिकेच्या सन २०१७ मध्ये शतकोत्तर सार्वजनिक गणेशोत्सवानिमित्त पुणे शहरात विविध कामांची अंमलबजावणी सुयोग्य पध्दतीने होण्याच्या दृष्टीकोनातून महापौर, पुणे महानगरपालिका यांच्या अध्यक्षतेखाली बैठक होऊन शाडू मातीचे गणपती बनविण्याचा कार्यक्रम आयोजित केला होता.

या कार्याक्रमाची गिनीज बुक ऑफ रेकॉर्डमध्ये नोंद करण्यासाठी ३००० विद्यार्थ्यांनी भाग घेतला होता, हे खरे आहे.

या प्रकरणी गिनिज बुक ऑफ रेकॉर्डमध्ये नोंद घेण्याच्या प्रक्रीयेला एकूण १४ तांत्रिक त्रुटी आढळल्या असून त्याचे निराकरण करण्याची प्रक्रिया पुणे महानगरपालिकेमार्फत सुरू आहे.

यामध्ये महानगरपालिकेच्या २५ शाळांमधून ६०० विद्यार्थी, खाजगी व्यवस्थापनाच्या ९२ शाळांमधून २४०० विद्यार्थी असे एकूण ३००० विद्यार्थ्यांनी या उपक्रमामध्ये प्रत्यक्ष सहभाग नोंदविला होता.

शतकोत्तर रौप्य महोत्सवी गणेशोत्सवासाठी महानगरपालिकेच्या सन २०१७-१८ चे अंदाजपत्रकामध्ये विविध उपक्रमांसाठी करण्यात आलेल्या तरतूदींपैकी रुपये ३० लाख प्राथमिक व माध्यमिक शिक्षण विभागासाठी उपलब्ध करून देण्यास पुणे महानगरपालिकेमार्फत मंजूरी देण्यात आली होती.

प्राथमिक शिक्षण विभागास प्रत्यक्षात रुपये ७.९२ लाख उपलब्ध करून देण्यात आले होते. त्यामधून टोपी, टी शर्ट, व्हीडीओ कॅमेरा व स्टील कॅमेरा, पाण्याच्या बाटल्या व बिस्किटे या बाबींवर प्राथमिक शिक्षण विभागामार्फत रुपये ५,१०,६२०/- खर्च करण्यात आला आहे. तसेच एकूण खर्च रकमेमध्ये जी.एस.टी. चा समावेश आहे.

या सर्व प्रक्रियेचे छायाचित्रण करण्यात आले असल्याचे पुणे महानगरपालिकेने कळविण्यात आहे.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**विधान भवन :**
**मुंबई.**

**जितेंद्र भोळे**
**सचिव (कार्यभार),**
**महाराष्ट्र विधानपरिषद.**

---

मुद्रणपूर्व सर्व प्रक्रिया महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालयाच्या संगणक यंत्रणेवर करण्यात आली आहे.
मुद्रण: शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई.